श्री सन्त एकनाथ जीवन-दर्शन

व

# श्री एकनाथ संस्तुतिः

मराठी 'इन्दु' व्याख्या व अलका टीके-सह



लेखक
श्री आत्माराम शास्त्री बोरकर, काशी.

# श्रीसन्त एकनाथ जीवनदर्शन

व

# श्री एकनाथ संस्तुतिः

( मराठी "इन्दु" व्याख्या व "अलका" टीके सहित )



लेखक व रचयिता—

**श्री आत्मारामशास्त्री घोरकर**

साहित्य सुधाकर, सा० दर्शनाचार्य

( काशी )

# समर्पण

ज्यांनीं १४ व्या शताब्दिमध्यें दक्षिणोत्तर भारतातींल सांस्कृतिक,
धार्मिक व आध्यात्मिक एकता सुदृढ करणाऱ्या ज्या परम
भक्तास गौरवान्वित केले, त्या भक्ताची गौरवगाथा
गाईलेल्या ह्या दोन्ही कृती त्या त्रिपथगामिनी
सकल जनतारिणी भगवती

**गंगामाईंच्या**

व

जगज्जननी भगवती

**अन्नपूर्णामाईंच्या**

चरण कमलीं अनन्य भावानें
भक्तिपुरस्सर सादर
समर्पण

विनीत

**आत्माराम शास्त्री**

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

शरण शरण एकनाथा
पायीं माथा ठेविला,
श्री तुकाराम.

मकर संक्रमणाचे शुभ व पवित्र दिवशीं माझे गुरुवन्धु ह. भ. प. आत्मारामशास्त्री बोरकर यांच्या "श्री सन्त एकनाथ जीवन दर्शन" व "श्री एकनाथ संस्तुति." या उत्कृष्ट पुस्तकास 'दोन शब्द" लिहिण्याचा "पर्वणी योग" आला आहे. "पर्वणी" म्हणण्याचे आणखी एक कारण म्हणजे पुस्तकातील विषय महाराष्ट्रातील साक्षात्कारी थोर सन्त 'श्री एकनाथ महाराज" हा आहे व त्यांचे गुणवर्णन करून सांगणारे, भगवद् भक्तींत रंगलेले" आत्माराम शास्त्री" हे लाभले आहेत.

## श्री एकनाथ व त्यांचे उत्ताम कार्य—

'तुकिता तुलनेशी । ब्रह्म तुकासी आले', ज्यांची काया कीर्तन करतांना ब्रह्मीभूत होत असे, सदेह वैकुंठाला जाण्याचें अघटित आश्चर्य ज्यांनी कलियुगांत वर्तविले, असे श्री तुकोबाराय त्यांनीं ही अंगीं सेवकपण बाणून ज्यांच्या चरणावर लोळण घेतली, ते पैठणचे श्री एकनाथ महाराज होत. त्या नाथ महाराजांचे वर्णन करितांना कोणाही सहृदय भक्ताच्या वाणीला आनंदच होईल. नाथ महाराजांनीं संस्कृत "भागवत एकादश स्कन्ध" सकळांना मराठींत श्रुत केले. ज्ञानेश्वरीचे संशोधन हे ही त्यांचे आणखी एक उत्तम कार्य आहे. आमचे पूज्य गुरुवर्य वै० मामासाहेब दांडेकर म्हणत की—"ज्यास ज्ञानेश्वरी ग्रन्थ चांगला समजावा असे वाटत असेल त्यांनीं भागवताची पारायणे करावीत"

श्री तुकाराम महाराजांनी "भंडारा" डोंगरावर नाथभागवताची हजार पारायणे केली होती अशी आख्यायिका आहे. याची साक्ष म्हणून "गाथा व नाथ भागवता" तील समानार्थी अनेक स्थळें दाखविता येतील.

"नाथ भागवत" हा प्रासादिक ग्रन्थ आहे. "भावार्थ रामायण" हा ग्रन्थ तर प्रभु रामचन्द्रांनीं "नाथांना" झोपेतून उठवून लिहून घेतलेला प्रचण्ड ग्रन्थ आहे. या शिवाय अनेक स्फुट कविता व अभंग नाथांनीं लिहिलेले आहेत. हे सर्व वाङ्मय आपल्या कडील वारक-यांनीं कंठगत केलेले आहे, ते त्या ग्रन्थांचमा जिवंत पणाची साक्ष देतात.

पैठणला दरवर्षी फाल्गुन महिन्यांत भरणारी मोठी यात्रा नाथांच्या अमरत्वाची साक्ष देते. घरचे खाऊन, कडक उन्हांत पायीं हजारो लोक नाथांच्या गावीं दूर दूरच्या भागातून येतात. त्यावरून नाथ हे केवढे मोठे लोहचुंबक आहेत. जवळ जवळ चारशे वर्षे झाली तरी त्यांची शक्ति कमी न होता शुक्ल पक्षातील चन्द्राच्या कले प्रमाणें ती वाढतच आहे. वर्षाकाळीं सरिता प्रतिदिनीं वाढत असते तशी नाथांची दिव्य कीर्ति काळाला गवसणी घालून राहिली आहे.

**श्री एकनाथ संस्तुति परिचय—**

असे हें अमृतचरित्र प्राकृत व संस्कृत भाषेंत जिव्हाळ्यानें कथन करण्याचे कार्य माझे स्नेही आत्माराम शास्त्रींनीं या बहुमोल पुस्तकांत केले आहे. "श्री एकनाथ संस्तुति गाण्डीवम्' या प्रसिद्ध संस्कृत साप्ताहिकांत ही प्रसिद्ध झाली आहे. ज्यांना संस्कृत येत नाहीं, अशां साठीं मूळ संस्कृत श्लोक देऊन पदच्छेद समास-विग्रह व अन्वय-अर्थ 'इन्दु' व्याख्या व 'अलका' टीकेसहित दिले आहेत.

नाथांचे चरित्र देतांना त्यांची साधना, श्रीगुरु जनार्दन स्वामींचा झालेला अनुग्रह, नवविधा भक्ति, त्यांच्या अंगचे दैवीसंपत्तीचे गुण, कुटिल निन्दकांनीं केलेला त्यांचा छळ, नाथानीं तो लीलेनें सोसला त्याचे वर्णन, सर्वाभूती वसत असलेला भगवद्भाव, त्यांनीं केलेली ग्रन्थ सम्पत्ति इत्यादि भाग तन्मयतेनें व रसिकतेनें आत्माराम शास्त्रीजींनीं वर्णन केला आहे. तो वाचतांना "तुष्यन्ति च रमन्ति च" अशी वाचकांची अवस्था होऊत जाईल.

**श्रीसन्त एकनाथ जीवन दर्शन—**

श्री सन्त एकनाथ जीवन दर्शन या भागांत महाराजांच्या चरित्राचे मराठी भाषेंत भावार्थरूपानें कथन केले आहे. ते केवळ संस्कृतचे भाषान्तर नाही, त्यांत काहीं संस्कृत श्लोकांच्या आधारे नाथ महाराजांच्या दैवी गुण संपत्तीचा परिचय शास्त्री बोवांनीं करून दिला आहे. वाचनास सुरुवात केल्यावर ते संपेपर्यन्त पुस्तक खाली ठेवता येत नाही व संपल्यावर 'तृप्ति भुकेली" अशी स्थिति होते.

या उत्तम ग्रन्थ रचनेचे लेखक ह. भ. प. आत्माराम शास्त्री बोरकर हे आमच्या आळंदीं येथील वारकरी शिक्षण संस्थेचे नामवंत माजी विद्यार्थी आहेत. गेली ८।९ वर्षे ते वाराणसेय संस्कृत विश्वविद्यालयाच्या परीक्षांचा अभ्यास करित असून "शास्त्री" व "आचार्य" पदवीच्या (दोन) परीक्षेंत ते आता पर्यन्त उत्तीर्ण झाले आहेत. "गाण्डीवम्" सारख्या संस्कृत साप्ताहिकांत पंढरपुर, आळंदी, नासिक, त्र्यंबक, नेवासे आदि तीर्थांची व तेथील ज्ञानदेवादि सन्त व त्यांचे भक्त यांची माहिती तिकडील भक्तजनांना देण्याचे महत्कार्य ते करित आहेत. आनं-

दाची गोष्ट म्हणजे संस्कृत पंडित झाल्यामुळें हरिभक्त परायणा बरोबर ते शास्त्र संपन्न ही झाले आहेत.

## भावनात्मक ऐक्याचा उत्तम मार्ग—

ईश्वर एक आहे व सर्व मानव हे त्याची लेकरे आहेत. ज्यांना ज्यांना भगवंताचा साक्षात्कार झाला असे भगवत् पूज्यपाद श्री शंकराचार्य, श्रीज्ञानदेव, कबीर साहेब, तुलसीदासजी, नरसी मेहता, श्री रामकृष्ण परमहंस आदि सर्व सन्त या देवासंबंधी एकच भाषा बोलतात. हे त्यांच्या चरित्रांचा व ग्रन्थांचा अभ्यास केला तर आढळून येते. 'भावनात्मक ऐक्याची आपल्या भारतांत जरुरी आहे' असे आपले पुढारी सांगत असतात, परन्तु ते ऐक्य साधण्याचा एक उत्तम मार्ग म्हणजे "देव भक्ति" आहे, भारतांत काशी विश्वेश्वर, राम–कृष्ण यांचे नांव काढले की--कैलास ते कन्या--पुरी, सिन्धु ते ब्रह्मपुत्रा कोठल्याही भागातील सर्वांचे हात जोडले जातात. ह. भ. प. आत्माराम शास्त्रींचा प्रयत्न या दृष्टिनें अत्यन्त महत्त्वाचा आहे. त्यांना त्या बद्दल धन्यवाद दिले पाहिजेत.

भगवान् श्री विश्वनाथांच्या चरणीं नम्रपणानें विनवणी करितो की— आत्माराम शास्त्री हे आमच्या ज्ञानोबा माऊलीचे लाडके लेकरूं तुमच्या चरणीं राहावयास आले आहेत. त्यांचा आपण कृपाळुपणानें अंगीकार केलाच आहे. आपल्या कृपेची पाखर त्यांचेवर निरंतर असू द्यावी, व ते सकल-विद्यांचे अधिकरण होऊन सारस्वताची अशीच सेवा त्यांचे हातून उत्तरोत्तर करून घ्यावी.

"काय बहु बोलो, अवघे पायीं विदित"

आळंदी देवाची<br>पौष वद्य एकादशी १८९०<br>मंगलवार, मकरसंक्रात.

सन्त चरणरज<br>स. के. नेऊरगांवकर<br>( बी. ई. माजी पुणे शहर इंजिनियर. )

नमो विश्वाकारं विठुमनुदिनं नीलवपुषम्<br>नमो ज्ञानेशाख्यं विमलयशसं वैष्णववरम् ।<br>नमो नाथं सन्तं सततमथ वारीकरमहम्<br>तुकारामं नौमि प्रखरतरवैराग्यविभवम् ॥

( "विनय" रा. पा. वि. )

न्याय-वेदान्त-व्याकरणाचार्यादि पदवींनी विभूषित, वाराणसेय श्रीसाधुवेला संस्कृत महाविद्यालयाचे प्रधानाचार्य पं० श्रीगणेश झा महोदयांचे—

## शुभाशंसनम्

आयुष्मता "आत्मारामशास्त्रिबोरकरेण रचितां प्रसन्नगम्भीरपदां न केवलं महाराष्ट्रस्यापितु समस्तस्य भारतस्य भास्करस्येव प्रकाशकस्य महामुनेरेकनाथस्य संस्तुतिमामूलचूलं निरीक्ष्य प्रसीदतामनसा विश्वभर्तारमभ्यर्थये—रचयितारमनल्प-नवनवकल्पनाशक्तिप्रदानेनानुग्रहीतुमिति ।

माघ शुक्ल द्वादशी संवत् २०२५, वाराणसी. गणेश झा

## शुभाशंसनम् चे मराठी भाषान्तर

समस्त भारतास प्रकाश देणाऱ्या भगवान् भास्कराप्रमाणे न केवळ महाराष्ट्रास अपितु निखिल भारतास ज्ञानप्रकाश देणारे महामुनि श्रीसन्त एकनाथ-जींची आयुष्मान् श्री आत्मारामशास्त्री बोरकरांनीं रचिलेल्या प्रसन्न व गंभीर पदांनीं युक्त असलेल्या 'संस्तुती" चे आद्योपान्त निरीक्षण करून प्रसन्न मनानें विश्वप्रतिपालक भगवंताची मी प्रार्थना करितो की —( प्रस्तुत ) संस्तुतीची रचना करणाऱ्यास अनल्प नवीन-नवीन कल्पनाशक्ति देऊन अनुग्रहीत करा.

पं० श्री गणेश झा.
( न्याय-वेदान्त-व्याकरणाचार्य )

## 'श्रीहरिः शरणम्'

श्रीमता बोरकरोपाधिभाजाऽऽत्मारामशास्त्रिणा श्रीमतामेकनाथाभिधमहात्मनां श्लोकबद्धं चरितं विरचय्य तस्य महाराष्ट्र ( मराठी ) भाषानुवादेन च लोकानां समक्षमानीय जगतो महानुपकारो व्यधायि इति सुदृढो मे विश्वासः ।

अनेन कर्मणा ध्यानमार्गस्य भक्तिमार्गस्य चोपदेशः सुष्ठु सम्पादितो येन जिज्ञासुजनो झटिति सन्मार्गे आत्मानं संस्थाप्यापरान् सहचरानपि संस्थापयिष्य-तीति

रचयितारमात्मारामशास्त्रिणं शुभाशीर्भिर्वर्धयन् भगवतो विश्वेशितुरस्य ग्रंथो-क्तसिद्धान्तस्य भूयासं प्रचारं कामयते—

रामप्रसाद त्रिपाठी

प्राचीनव्याकरण-दर्शन-आगमविभागाध्यक्षः । वाराणसेय संस्कृत विश्वविद्यालय वाराणस्याम्, माघे शु० पूर्णिमायां रविवासरे २०२५ विक्रमे ।

# शुभाशंसा

अस्त्ययमाध्यात्मप्रधानो धर्मप्रधानश्च भारतवर्षः। यथासमये ह्रियमाणे परिवर्तमानेऽपि च धर्मे सुपल्लविताऽत्राध्यात्मिकभावना। मानवजीवनसाफल्यञ्चाध्यात्माभिमुखप्रवृत्त्यैव सम्भाव्यते। आत्मसंस्कारमहत्त्वं परिज्ञाय याऽन्तरिकसाधना विधीयते साऽवश्यमेव मानवजीवनं समुन्नयति। यैर्महात्मभिर्महापुरुषैर्वाध्यात्मिकामृतवर्षणेन निखिलः संसारः समुन्नतिं नीतस्तेषां सुचरितमवश्यमेव स्मरणीयमस्ति। एतेन मानवः परमपुरुषार्थरूपं मोक्षसुखं लभते।

महाराष्ट्रप्रदेशे समुद्भूतानां मूर्तिमद्भागवतधर्माणां श्रीमताम् एकनाथमहाभागानां सुचरितं भेदाऽभेदसमर्थकस्य कस्यापि लीलावतारपुरुषस्य चरितं स्मारयति। तेषां ध्यानमग्नदशायां फणिना निजफणेन आतपनिवारणं, गार्हस्थ्यधर्मपरिपालनेऽपि तत्राऽलिप्तत्वं बहुसंख्यकाध्यात्मिकग्रन्थानां निर्माणञ्चेति कार्यजातं मानवचेतसि चमत्कृतिमावहति।

अत्र हर्षस्याऽयं विषयः, यत् श्री आत्मारामशास्त्रिमहोदयैर्निर्मलमानसैः परममेधाविभिरस्य महापुरुषस्य चरितं खण्डकाव्यं निर्माय प्रकाशतां नीतम्। इयं पद्यरचना सुललिता मनोहारिणी च वर्तते। अस्याः शब्दसौष्ठवं सुकवितुल्यं प्रतिभाति।

मन्ये अस्याः कृतेरनुशीलनेन जिज्ञासवोऽवश्यमेव लाभान्विता भविष्यन्ति। रचनामिमामहमभिनन्दामीति।

माघ शु०
संवत् २०२५
वाराणसी

डॉ० किशोरदास स्वामी
सर्व-दर्शनाचार्य, काव्यतीर्थ,
विद्यावारिधि ( पीं० एच्० डी० )
अध्यक्ष — दर्शन विभाग,
श्रीसाधुवेलासंस्कृतमहाविद्यालय, वाराणसी

# शुभाशंसेचा मराठी अनुवाद

आपला भारतदेश अध्यात्मप्रधान व धर्मप्रधान आहे. यथासमयीं ( येथें ) धर्माचा ऱ्हास व त्यांत परिवर्तन झाले तरी आध्यात्मिक भावना सुपल्लवित होत गेली. मानवजीवनाची सफलता आध्यात्माभिमुख प्रवृत्तिद्वाराच संभवनीय आहे. आत्मसंस्काराचे महत्त्व जाणून जी आन्तरिक साधना केली जाते ती अवश्य ही मानवजीवन समुन्नत करिते. ज्या महात्म्यांनीं वा महापुरुषांनीं आध्यात्मिकामृताच्या वर्षणानें निखिल संसार समुन्नत केला, त्यांचे सुचरित्र अवश्यही स्मरणीय आहे. त्यानें मानवास परमपुरुषार्थरूप मोक्षसुख प्राप्त होते.

महाराष्ट्र प्रदेशांत अवतीर्ण झालेले मूर्तिमन्त भागवतधर्मांचे स्वरूप श्रीसन्त एकनाथ महाराजांचे सुचरित्र भेदाभेदाचे समर्थन करणाऱ्या कोणत्याही लीलावतारी पुरुषाच्या चरित्राचे स्मरण करविते. ध्यानमग्नस्थितींत नागानें आपल्या फणीनें ( त्यांचे ) रक्षण करणे, गृहस्थाश्रमधर्मांचे पालन करून ही त्यांत अलिप्त राहाणे व बहुसंख्यक आध्यात्मिक ग्रन्थनिर्माण करणे, इत्यादि कार्यकलाप मानवांच्या चित्तांत चमत्कृति उत्पन्न करितात.

येथे हा आनंदाचा विषय आहे की - परमबुद्धिमान श्री आत्माराम शास्त्रींनीं निर्मल अन्तः करणानें ,ह्या महापुरुषाचे चरित्र खण्डकाव्य रूपानें निर्माण करून प्रकाशित केले. ही पद्यरचना सुललित व मनोहारिणी आहे. हीचें शब्दसौष्ठव सुकविप्रमाणें प्रतीत होते.

आशा आहे की - ह्या रचनेच्या अनुशीलनानें जिज्ञासु लोक अवश्य ही लाभान्वित होतील. मी ह्या रचनेचे हार्दिक स्वागत करितो.

डॉ० किशोरदास स्वामी.
सर्व-दर्शनाचार्य, काव्यतीर्थ
विद्यावारिधी (पी० एच० डी०)

# शुभमाशंसते

सार्वत्रिकसतां रूपे. स्वभावे चैकरूपता।
तस्य प्रभावाल्लोकोऽपि, भवत्युपकृतोऽद्भूतः॥ १॥
तादृशाः साधुपुरुषाः, सन्मार्गप्रदर्शकाः।
जगद्धिताय जायन्ते, काले काले महीतले॥ २॥
तेषां चरितसूत्रेण, गुम्फिता देशवासिनः।
ऐक्यभावं भजन्ते वै, विभिन्नपथगामिनः॥ ३॥
संस्कृतिर्भारतीया मे, स्वस्था संवलिता च तैः।
इतिहासपुराणेभ्यः, साधु सा ह्यवगम्यते॥ ४॥
पुस्तककलशे चात्र, कलिरोगमलापहम्।
संस्तुतिव्याजमाश्रित्य, चैकनाथकथामृतम्॥ ५॥
आत्मारामेण रचितं, भक्तिभावरसायनम्।
पठित्वा मुमुदे चित्तं, मामकीनं स्वभावतः॥ ६॥
अग्रेऽपि प्रचलेदेवं लेखनी ब्रह्मचारिणः।
सनातनपथे नित्यं धर्मसंस्कृतिहेतवे॥ ७॥

रामापुरा, वाराणसीं,
माघ शु० एकादशी सं० २०२५

रामबालक शास्त्री
प्रधान सम्पादकः, "गाण्डीवम्"

## "शुभमाशंसते" चे मराठी भाषान्तर

सर्वकाळांत व सर्वदेशांत उत्पन्न होणाऱ्या संतांच्या रूपांत ( अनुभवांत ) स्वाभाविक एकरूपता दिसते, जिच्या प्रभावामुळें हा अद्भूत लोक ही उपकृत होतो. ॥ १ ॥

अशा प्रकारचे साधु पुरुष जे सन्मार्ग प्रदर्शक असतात ते पृथ्वीतलावर समयीं समयीं लोककल्याणा करितो अवतीर्ण होतात. ॥ २ ॥

त्यांच्या चरित्ररूपी सूत्रानें गुंफिलेले. विभिन्न मार्गांचे आचरण करणारे देशवासी लोक पारस्परिक एकतेचे परिपालन करितात. ॥ ३ ॥

माझी भारतीय संस्कृति त्या संतांच्यामुळें स्वस्थ व व्याप्त आहे, ती इतिहास व पुराणादिकांतून चांगली जाणली जाते ॥ ४ ॥

ह्या पुस्तक कलशांत कलिरोगरूपी मलाचे अपहरण करणारे, भक्तिभावाचे रसायन श्रीसन्त एकनाथ कथामृत संस्तुतीच्या रूपानें श्री आत्मारामशास्त्रींनीं रचिले आहे ते वाचून माझे चित्त स्वभावतः आनंदीत झाले. ॥ ५–६ ॥

वेदशास्त्रानुसार सन्मार्गाचे अनुगमन करणाऱ्या श्री आत्मारामशास्त्रींची लेखणी धर्म व संस्कृतिकरितां सनातन पथावर नित्य पूढे ही चालू राहो हीच माझी शुभेच्छा. ॥ ७ ॥

# "ह्या ग्रन्था विषयी माझें हृद्गत"

पवित्र भारतभूमि जगाचे आध्यात्मिक केन्द्र असल्यामुळें येथें समयीं समयीं कोणी ना कोणी नरपुंगव, सन्त अवतीर्ण होतात. जे आपल्या ज्ञान-प्रकाशाने केवळ भारतास च नव्हे, साऱ्या विश्वास आलोकित करून सुख, शान्ति व आनन्दाचा पाया सुदृढ करितात.

**सचलतीर्थ—**

धर्मग्रन्थांनीं सन्तांनां "सचल तीर्था" ची उपमा देऊन म्हटले आहे की—सन्तांच्या दर्शनाने ही पुण्याची प्राप्ति होते. अन्य तीर्थ नियत समयी च फल देतात, तेथें तेथें गेल्यावरच पुण्य प्रदान करितात, पण सन्त चालते-बोलते तीर्थ होण्यास्तव त्यांच्या समागमाचे फल तत्काल मिळते. सन्त स्वतः विभिन्न स्थानीं विविध लोकांसमोर उप-स्थित होऊन आपल्या ज्ञान भक्ति व योगाद्वारा जन-कल्याण करितात—

साधूनां दर्शनं पुण्यं तीर्थभूता हि साधवः।
तीर्थं फलति कालेन सद्यः साधुसमागमः॥

**सत्संगाचा महिमा—**

स्कन्धपुराणांत संतांचा समागम सहस्त्रप्रकाश किरणांनीं युक्त सूर्याप्रमाणें अद्‌भूत प्रभावशाली म्हटला आहे, कारण हा ( सत्समागम ) प्राण्यांचे अन्तः-करणातील अज्ञान-रूपी अन्धकाराचा पूर्णनाश करणारा आहे—

तीर्थादप्यधिकःस्थाने सतां साधुसमागमः

नारदभक्तिसूत्रांत ही सत्संगाची महिमा गातांना म्हटले आहे की—"सत्सङ्गो दुर्लभोऽगम्योऽमोघश्च" अर्थात सत्संग दुर्लभ आहे, अगम्य आहे. त्याचे फल महान् आहे. सत्समागम भवरोगाचा नाश करणारा आहे. जसे संत प्रभावकारी असतात तसेच त्यांचे ग्रन्थ ही प्रभावशाली असतात, कारणते त्यांच्या जिव्हाळ्याचे प्रेमाचे व स्वानुभवाचे उद्‌गार असतात; म्हणून सद्ग्रन्थांचे अध्ययन-मनन व चिन्तन ही फलप्रद आहे. सन्त जसे बोलतात तसेच वागतात नि म्हणून ते जगांत वन्द्य एवं पूज्य मानले जातात. प्रसिद्ध सन्त श्री तुकोबारायांनीं म्हटले आहे की—"बोले तैसा चाले। त्याची वन्दिन पाऊले" अर्थात् जो बोलल्याप्रमाणें वागतो त्यास मी नमस्कार करिन. असा आहे संताचा व सत्समागमाचा महिमा.

**श्रीसन्त एकनाथ—**

तारागणांत चन्द्राचे, वृक्षांचे वनांत चन्दन वृक्षाचे व असंख्य पुष्पांत कमल पुष्पाचे जितके महत्वाचे स्थान आहे तितकेच महाराष्ट्रांत १४ व्या शताब्दि-मध्यें त्रिविध तापांनी सन्तप्त झालेल्या जनांचे ताप निवारण करणाऱ्या श्रीसन्त एकनाथ महाराजांचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. त्याच्यांत लहानपणापासून च महान

विचारांची बीजें रोविली गेली होती. भगवद् भक्तीच्या प्रभावानें व ईश्वराच्या कृपेनें पूढे तीच पुष्पित एवं फलित होऊन 'बहुजन सुखाय बहुजन हिताय' कारणीभूत झांली.

श्रीसंत एकनाथ महाराजांनीं आपले सद्गुरु श्री जनार्दन स्वामींची श्रद्धा—भक्तिपूर्वक सेवा केली होती. त्यामुळे त्यांच्यांत महान् गुरुशक्ति अवतरित झाली होती. यद्यपि त्याचे गुरुदेव श्री जनार्दन स्वामी भगवान् श्री दत्तात्रेयांचे उपासक होते, तथापि त्यांनीं तत्कालिन सामाजिक व आध्यात्मिक स्थिति पाहून आपल्या प्रिय शिष्यास भागवत धर्माची दीक्षा दिली, व आजीवन ब्रह्मचारी वा संन्यासी न बनवून आदर्श गृहस्थाश्रमीं बनविले. त्यांना विश्वास होता की—एकनाथांद्वारा स्वीकृत एवं आचरित आदर्श गृहस्थाश्रम पाहून जनता ही त्यांच्या मार्गाचे अनुसरण करिल व जीवनांत सुख—शान्ति एवं आनन्द प्राप्त करून परमपद प्राप्त करूं शकेन.

श्री एकनाथांचे जीवन चरित्र पाहूं गेले असता दिसून येते की—त्यांनीं आपल्या जीवनांत श्रीमद्भगवद् गीतेतील हा श्लोक चरितार्थ केला आहें.—

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥
गी. अ. ३।२१.

आदर्श गृहस्थाश्रम—

आदर्श गृहस्थाश्रमाचा 'मातृवत् परदारेषु परद्रव्येषु लोष्ठवत्" हा महान् सिद्धान्त आहे, श्री एकनाथांचे आचरण ही वरील सिद्धान्तानुसारच होते. त्यांच्यात राग—द्वेष, आप पर आदि द्वन्द्वांचा अभाव होता; अक्रोधी स्वभाव, अपरिग्रही वृत्ति, गृहस्थाश्रमोचित ब्रम्हचर्य, भूतमात्रांच्या कल्याणाची तत्परता, सदा सन्तोष आदि दैवीगुण त्यांच्यात वसत होते. त्यांच्या प्रभावानें व स्वकर्तव्यानें ते गृहस्थाश्रम धर्माचे सम्यक् पालन करून ईश्वर चिन्तन करित होते. त्यांनी भोगांत त्याग अर्थात् पाण्यांत राहून पाण्यापासून अलिप्त राहाणाऱ्या कमळा प्रमाणें संसारांत राहून अलिप्त—अनासक्त राहाण्याच्या महान् मार्गाचे मार्गदर्शनकेले.

विशाल व्यक्तित्व—

त्यांच्या त्या स्वच्छ व कोमल मार्गावर कित्येक दुर्जनांनी कांटे पसरविण्याचा प्रयत्न केला, परन्तु सच्चरित्र व स्फटिकाप्रमाणे स्वच्छ हृदय असलेल्या भक्तवत्सल श्रीएकनाथांनीं त्यांच्या त्या दुष्प्रवृत्तींची पर्वा न करितां निखिल प्राणी

मात्रांच्या कल्याणाकरितां भगवंताची प्रार्थना करून आदर्श व्यक्तित्व संपादन केले.

अशा अनेक महान् गुणांनीं विभूषित होण्यास्तव जनतेनें त्यांस "सन्त" ही परमोच्च व सन्माननीय पदवी देऊन चिरस्मरणीय बनविले.

## मूर्तिमन्त भागवत—

त्यांच्या विषयीं एक कथा आहे की—जेव्हां त्यांचे सद्‌गुरूंनीं त्यांजवर कृपा करून त्यांस भगवान् श्रीगुरु दत्तात्रेयांचे दर्शन करविले, तेव्हां ते समाधि अवस्थेंत निमग्न झाले होते. त्यावेळची त्यांची अशीं उच्चस्थिति पाहून श्रीदत्तात्रेय जनार्दन स्वामींना म्हणाले की—आपला हा शिष्य महान् संत व चालता-फिरता (मूर्तिमन्त) भागवत आहे.

कालान्तरानें श्रीएकनाथांनीं श्रीमद् भागवताच्या अकराव्या स्कन्धावर मराठी भाषेंत सरळ व सुमधुर टीका लिहून भगवान् श्रीदत्तात्रेयांची भविष्यवाणी यथार्थ केली. आजही मराठी भाषी जनता भक्ति-भावपूर्वक त्या ग्रन्थाचे पठन-पाठन, पारायण, चिन्तन करून आत्मशान्ति प्राप्त करित आहे. संत एकनाथां विषयीं विपुल साहित्य प्रकाशित व अप्रकाशित आहे, जनकल्याणार्थ त्याचे अनुसन्धान होणे अत्यावश्यक आहे. आशा आहे की महाराष्ट्रीय जनता त्याकरितां ही अग्रेसर होईल.

## अद्‌भूत सुयोग—

भक्तहृदय विद्वान् श्री आत्मारामशास्त्री बोरकर यांनीं श्रीएकनाथांचे जीवन, तत्त्वज्ञान व उपदेशांनीं परिपूर्ण "श्रीसन्त एकनाथजीवन दर्शन" व "स्वरचित" "श्रीएकनाथसंस्तुतिः नामक संस्कृत ग्रन्थ सर्वसामान्य जनांकरितां मराठींत सान्वय "इन्दु" व्याख्या व "अलका" टीकेसह प्रस्तुत केला आहे.

हा एक अद्‌भूत सुयोग म्हणतात येईल की—ज्या एकनाथांनीं ३९६ वर्षांपूर्वीं ज्या भगवती भागीरथीच्या तीरावर निवास करून मराठी टीका ग्रन्थ लिहून तत्कालिन दक्षिणोत्तर भारतातील सांस्कृतिक व आध्यात्मिक एकता सुदृढ केली, त्याच भगवती भागीरथीच्या तिरीं त्यां एकनाथांचे जीवन चरित्र संस्कृत भाषेतून प्रकाशित होत आहे.

श्री आत्मारामशास्त्रींचे हे महान् व स्तुत्य कार्य आहे. ते याप्रमाणें श्रीसन्त एकनाथांविषयीं अन्य ही ग्रंथ निर्माण करून जनकल्याणार्थ मराठी साहित्याची अभिवृद्धि करित रहातील अशी आशा आहे.

माझा विश्वास आहे की – महाराष्ट्रातील लोक ह्या ग्रंथाचे अध्ययन करून त्यास जीवनांत उतरवून भवसागरातून पार होण्याचा प्रयत्न करतील.

राजाभोर शिवशंकरमन्दिर,
गायघाट,
वाराणसी (उ० प्र०)
वसंतपंचमी सं० २०२५

इति शुभम् —
श्रीमद् दत्तयोगेश्वरदेव तीर्थ
स्वामी महाराज

## नाथांची सेवा

आपले काव्य पोहचले. आपण नाथांची सेवा करित आहात, मी ही त्यांचा एक नम्र सेवक आहे. आपण श्री एकनाथांची ही काव्यमय सेवा त्यांच्या चरणीं रुजू केली, या बद्दल आपले हार्दिक अभिनन्दन. आपल्या हातून श्री नाथांची अशीच सेवा उत्तरोत्तर घडावी व त्यांच्या कृपाप्रसादाला आपण अधिक पात्र होत राहावे, ही त्यांचे पाशीं प्रार्थना.

माघ शु० सप्तमी
शके १८९०
यावली, वैराग, सोलापुर,

बळवन्त गिरिराव घाटे
अध्यक्ष
श्रीएकनाथ संशोधन मन्दिर,
खडकेश्वर, औरंगाबाद,
महाराष्ट्र.

# भूमिका

**" भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम् "**

(कालिदास)

जो त्रैलोक्य प्रतिपालक परमात्मा युगायुगांत साधूंचे रक्षण, दुष्टांचा संहार व धर्माची संस्थापना करण्याकरितां अवतीर्ण होती त्या परमात्म्याचे अंशभूत असलेले परम कल्याण करणारे साधु-सन्त ही समयीं समयीं त्याच कार्याकरितां अवतीर्ण होतात. **'मार्गाधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे'** हे त्यांच्या जीवनाचे ध्येय-लक्ष्य असते, म्हणून ते स्वत: सत्कर्माचे व सद्धर्माचे आचरण व पालन करि-तात. ते करित असतांना त्यांना अनेक कष्ट सहन करावे लागतात. नाना विप-त्तींना तोंड द्यावे लागते तरी ही ते धैर्य न सोडता, संकटांची पर्वा न करितां भगवंतावर विश्वास ठेवून प्रयत्न बलानें स्वत: सन्मार्गावर आरूढ होऊन निज जीवनाचे लक्ष्य प्राप्त करून भावी पीढीसमोर उच्च आदर्श स्थापित करितात. त्या आदर्शांचे अनुसरण करून लाखो लोक निज जीवन सफल बनविण्याचा प्रयत्न करितात.

अशा प्रकारे संताचे कार्य अलौकिक व कष्टतर असूनही सर्वांना उद्बोधनीय व अनुकरणीय असते म्हणूनच श्री ज्ञानराज माऊलींनीं सर्व जीवांना जागृत करून सन्देश दिला आहे की—जीवांना आपल्या यथार्थ स्वरूपाची प्राप्ति (ओळख) करून घ्यावी वाटत असेल तर त्यांनीं सदा संतांची चरित्रें ऐकावीत, त्यांच्या चरित्राचे गुणगान करावे—

... **हारपले आपणपे पावे । तै संताते पाहाता गिवसावे ।**
**म्हणोनि बानावे ऐकावे । तेचि सदा ॥** ज्ञानदेवी ॥

जसे आईला आपल्या सत्कारापेक्षा आपल्या मुलाचा वा मुलीचा सत्कार व श्रीगुरूला आपल्या कीर्तिपेक्षा आपल्या शिष्याची कीर्ति अधिक आवडते, तसे भग-वंताला आपल्या स्तुति पेक्षा आपल्या भक्ताचे गुणगान अधिक आवडतात, म्हणून त्यांनी घोषणा केली आहे की—

**ते ही प्राणापरौते । आवडती हे निरुते ।**
**जे भक्त चरित्राते । प्रशंसिती ॥** ज्ञाने० अ० १२।१९।२२७.

वरील माऊलींच्या संदेशाला व भगवंताच्या आदेशाला अनुसरून मी भागवत धर्म मन्दिराचे आधारस्तंभ झालेल्या 'श्री संत एकनाथ' महाराजांची संस्तुति संस्कृत भाषेंत बानण्याचा प्रयत्न केला आहे. ती संस्कृत भाषेंत का ? या प्रश्नाचे

समाधानास संस्कृत भाषेचे वैशिष्ट्य, तिची व्यावहारिकता व तिच्या विकासाकरितां होत असलेले प्रयास यांचा संक्षेपतः विचार करावा लागेल, तो असा—

### संस्कृत व इतर भाषा—

संस्कृत विश्वातील सर्वांत प्राचीन व समृद्ध भाषा आहे. चिरकालिक कल्याण करण्याऱ्या भारतीय संस्कृतीचे व सभ्यतेचे विशद विवेचन ज्यांत केले आहे, ते वेद, स्मृति, रामायण, महाभारत व पुराणें आदि सर्व ग्रन्थ संस्कृत मध्यें आहेत. ज्यांत निखिल प्राणिमात्रांच्या ऐहिक व पारलौकिक समृद्धि व सुखशान्ति करितां आवश्यक असणारे आध्यात्मिक, धार्मिक, सामाजिक व राजनैतिक आचार-विचार आदि निहित आहेत. मधुरता, सरलता, सुलभता, अर्थगांभीर्य व अद्‌भूत शब्दनिर्माण शक्ति हे संस्कृत भाषेचे वैशिष्ट्य होय. त्यामुळें ती विश्वातील सर्व भाषांची जननी असून त्यांची उन्नति व समृद्धि करणारी आहे. त्यांच्यांत शेकडा ७५—८० शब्द संस्कृत भाषेतील आहेत म्हणून संस्कृत भाषेच्या विकासावरच इतर भाषांचा विकास अवलंबून आहे.

### संस्कृतची व्यावहारिकता—

निखिल प्राण्यांच्या जीवनोपयोगी विषयांचे विस्तृत विवेचन करणारे ग्रन्थ संस्कृत भाषेत विपुल प्रमाणांत संगृहीत व सुरक्षित आहेत, त्यांवरून भाषाविदांचे मत आहे की—'ज्या काळांत संस्कृतची ही विशाल ग्रन्थ संपदा निर्माण केली गेली, त्या काळीं अवश्य ही संस्कृत सर्व सामान्य जनांची व्यावहारिक भाषा असली पाहिजे'

भोजराजाच्या काळची आख्यायिका आहे की—त्यांचे राज्यांत संस्कृत भाषेत काव्य रचना करणे सर्वांना अनिवार्य होते, म्हणून त्या काळीं भारवाही (मोळी-विकणारे ही) सुसंस्कृत भाषा बोलत होते. संस्कृत वाङ्मयांत तद्‌विषयक खालील उक्ति सुप्रसिद्ध आहे—

"भारो न बाधते राजन् यथा बाधति बाधते"

हे राजन् ! मला मोळीच्या भारानें तितके कष्ट होत नाहीत, जितके आपण उच्चारलेल्या "बाध" धातुच्या "बाधति" या अशुद्ध प्रयोगानें होत आहे.

भगवत्पूज्यपाद श्री शंकराचार्यांच्या काळीं तर शिकविलेले पक्षी संस्कृत बोलत होते, असे 'कीराङ्गना यत्र गिरं गिरन्ति' या उक्ति वरून 'प्रत्यास येते. सारांश या व अशा अनेक उक्ति वरून ही संस्कृत सर्वजनांची व्यावहारिक भाषा होती या मताची पुष्टि होत आहे.

### संस्कृतच्या प्रसाराची च अवरोधाची कारणे—

भारतीय प्राचीन उच्च संस्कृतीचे, तीच्या उज्ज्वल आदर्शांचे व गौरवांचे

संरक्षण व पुनरुत्थान करण्याकरितां या सर्वांचे अधिष्ठान असलेल्या संस्कृतभाषेचा प्रचार व प्रसार होणे आवश्यक आहे, हे जाणून भारत सरकार संस्कृतच्या उन्नतिकरितां विविध प्रयास करित आहे. सरकारच्या या प्रयासामुळें व उदार शैक्षणिक नीतिमुळें शाळा, महाविद्यालय (कॉलेज) व विश्वविद्यालयांमध्यें संस्कृतचे शिक्षण दिले जावूं लागल्याने सर्वत्र संस्कृत भाषेचा पुनः प्रचार व प्रसार झाला नि होत आहे.

सम्प्रति प्रादेशिक भाषा प्रादेशीय राजकामाच्या भाषा झाल्यामुळें त्यांच्या समृद्धि व विकासाकरितां त्यांचे अधिष्ठान असलेल्या संस्कृतचे पुनरुत्थान होणे आवश्यक झाले आहे. तरी पण सध्या संस्कृतचा जितका प्रचार व प्रसार व्हावयास हवा तितका झालेला दिसत नाही. त्याची जी अनेक कारणे आहेत त्यांत प्रमुख कारण विधर्मियांचा तद्विषयक कुप्रचार, हे होय.

विधर्मियांचा भारतांत प्रवेश झाल्यावर त्यांनीं आपल्या भाषांचा व संस्कृतींचा प्रचार व प्रसार करण्याकरितां भारतीय संस्कृति व भाषांचे उन्मूलन करण्याचे दृष्टिनें त्यांचे अधिष्ठान असलेली "संस्कृत भाषा अति प्राचीन व कठिन भाषा असल्यानें, अनेक वर्षांपासून ती व्यवहारांत प्रचलित नसल्यानें, राजकीय व बोलचालीची भाषा होण्याची क्षमता तीच्यांत न राहिल्यानें मृतभाषा झाली आहे" असा भ्रामक व खोटा प्रचार केला.

पण स्वातन्त्र्योत्तर काळांत ही त्यांच्या या कुप्रचाराचे निर्मूलन न केले गेल्यामुळें भारतीय जनता आपल्या सर्वोच्च व गौरवास्पद संस्कृतिपासून विन्मुख झाली. तरी ही संस्कृतच्या स्वाभाविक गरिमेमुळें तिला सर्वत्र आदराचे स्थान मिलत राहिले.

**सामयिक स्तुत्य उपक्रम—**

भारतीय जनतेंत संस्कृत भाषा व तिच्यातील साहित्य यांजविषयी जितका आदर व श्रद्धा आहे तितकाच आदर व श्रद्धा त्या साहित्यांतील व शास्त्रांतील ज्ञानभाण्डार प्रादेशिक भाषांतून प्रकट करविणाऱ्या साधु-सन्तां विषयी व त्यांच्या वाङ्मया विषयीं ही आहे.

'मातृभाषेतर कोणत्याही भाषेचे ज्ञान बोलचालीच्या व्यवहारिक भाषेद्वारा दिले गेले तर त्या भाषेंत सर्वांचा सहजच प्रवेश होतो या भाषिक नियमानुसार संस्कृतला व्यावहारिक व लोकप्रिय बनविण्याकरितां संस्कृत भाषेचे सरलीकरण, संस्कृत ग्रन्थांचा प्रादेशिक भाषांतून अनुवाद व प्रादेशिक साहित्याची संस्कृत भाषान्तरे करण्याचा सामयिक स्तुत्य उपक्रम विद्वज्जन करित आहेत, नि त्यांत उत्साहवर्धक प्रगति ही झाली आहे.

तदनुसार उत्तरप्रदेशातील सुप्रसिद्धसन्त गोस्वामी तुलसीदासांच्या "रामचरितमानसाचें", सूरदासांच्या सूरसागरातील मौलिक कथांचे, सन्त कवीर व मीराबाईच्या काव्याचे व महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध सन्त श्री ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीचें व अमृतानुभवाचें, श्रीसन्त नामदेवराय, सन्त एकनाथ, श्रीसमर्थ रामदास व श्रीसंत तुकोबाराय आदि सन्तांच्या वाङ्मयाची संस्कृत भाषान्तरे प्रकाशित झाली आहेत नि होत आहेत.

"संस्कृत ज्ञानेश्वरी" विषयीं वै. ह. भ. प. शं. वा. दाण्डेकर यानीं लिहिले आहे की—"मूळ गीता संस्कृतांत असल्यानें सहाशे सत्तर वर्षापूर्वी ती दुर्बोध झाली. असे पाहून श्रीज्ञानराज माऊलींनीं ती आवाल-सुवोधांकरितां उघड अशा मराठीत आणली, पण सहाशे वर्षांनीं काल पालटला, तिचें मूल्य मराठी वाचकवर्गाकरिताच राहू नये, ते सर्वांना कळावे म्हणून पण्डितांची भाषा जी संस्कृत, तीत ज्ञानेश्वरीचें रूपान्तर [१] करण्तांत आले" त्यामुळे संत साहित्य ही संस्कृत समाजांत प्रिय होत आहे.

तसेच आधुनिक महाकवियित्री स्वर्गीय क्षमा रात्र विरचित प्राचीन महाकाव्यांच्या शैलीचे अनुगमन करणारी 'श्री ज्ञानेश्वर चरितम्' व 'श्री तुकाराम चरितम्' ही महाकाव्ये हि आपल्या चरित्रनायकांच्या वैशिष्ठ्यांमुळें संस्कृत समाजांत प्रिय झाली आहेत, पण त्यांचा अनुवाद राष्ट्रीय गौरवाची हानि करणाऱ्या व परकीयदासतेची स्मृति करून देणाऱ्या इंग्रजी भाषेंत असल्यामुळें सर्व सामान्य भारतीय जंनता त्यांच्या लाभापासून वंचित झाली आहे. यास्तव सर्वांच्या मनातील संस्कृत भाषेविषयीचा भ्रम दूर करण्याकरितां व सर्वांमध्यें संस्कृत भाषेविषयीं आवड निर्माण करण्याकरितां सरलातिसरल संस्कृत साहित्य प्रकाशित करण्याचा प्रयास संस्कृतानुरागी विद्वज्जन करित आहेत.

**लघुप्रयास—**

प्रस्तुत 'श्रीएकनाथ संस्तुतिः' ही अशाच प्रयासातील 'लघुप्रयास' आहे. या संस्तुतीचा वर्ण्य विषय, तिची भाषा व शैली आदि विषयाचें विस्तृत विवेचन ह. भ. प. श्री. नेऊरगांवकर यांनीं "प्रस्तावने"त केले आहे. म्हणून त्याची पुनरुक्ति न करितां इतकेच स्पष्ट करितो की—'संस्कृत भाषा कठिण आहे' हा भ्रम दूर करणे व प्रादेशिक भाषांच्या सुसमृद्धि करितां व त्याच्या विकासाकरितां सर्वांना संस्कृतची सामान्य ओळख करून देणें हाच उद्देश्य दृष्टिसमोर ठेऊन

१ ह. पा. भा. पृ. २५.

प्रस्तुत संस्तुतीची रचना करण्यांत आली असल्यानें संस्कृत भाषेतील सुबोधता 'मधुरता व सरलता या गुणांचा यथाशक्ति निर्वाह करण्याचा प्रयत्न करून तिच्यांत साहित्यिक अलंकारादिकांचा समावेश करण्याचा यत्न केला नाही. मूळ विषयाचा बोध व्हावा म्हणून मराठीत "इन्दु" व्याख्या व "अलका" टीका ही लिहिल्या आहेत.

ज्यां नाथ महाराज कैवल्याचा पुतळा, चैतन्याचा जिव्हाळा व त्रैलोक्याचे जीवन मानीत होते, त्या श्री ज्ञानराज माऊलींचे 'पसायदान" त्यांना किती प्रिय असेल? हे "अनुभवाचि जोगे। नोहे बोला ऐसे" म्हणून त्याचे ही संस्कृत भाषान्तर मराठी अर्थासह दिले आहे.

संस्कृत वाङ्मय रसिक जन प्रस्तुत रचनेचे व पुस्तकाचे मनापासून स्वागत करून अशीच सारस्वत सेवा करण्यास मला सक्रिय प्रोत्साहन देतील असा विश्वास वाळगतो.

## उपकारस्मरण व निवेदन

माझ्या विनंतीस मान देऊन ह. भ. प. श्री. स. के. नेऊरगांवकर यांनीं आपल्या मागील कार्यांचा व्याप सांभाळून आत्मीयतेनें प्रस्तुत पुस्तकाकरितां "दोन शब्द" रूपानें "प्रस्तावना" लिहून पाठवून मला उपकृत केले आहे; तदर्थ मी त्यांचा अत्यन्त ऋणी आहे.

तसेच वाराणसेय श्रीसाधुवेला संस्कृत महाविद्यालयाचे प्रधानाचार्य पण्डित श्री गणेश झा जी, दर्शन विभागाध्यक्ष श्री किशोरदास स्वामीजी, वाराणसेय संस्कृत विश्वविद्यालयातील प्राचीन व्याकरण-दर्शन-आगम विभागाध्यक्ष पं० श्री रामप्रसाद त्रिपाठी जी, भारतव्यापी संस्कृत साप्ताहिक पत्र "गाण्डीवम्" चे प्रधान सम्पादक पं० श्री रामबालकशास्त्रीजी श्रीमत् स्वामी दत्तयोगेश्वरदेव तीर्थ जी व श्री एकनाथ संशोधन मन्दिराचे अध्यक्ष श्री व. गि. घाटे यांचा मी चिर-काल ऋणी व कृतज्ञ आहे, ज्यांनीं प्रस्तुत "संस्तुती" चे निरीक्षण करून, आपल्या शुभ-कामना व शुभाशिर्वाद देऊन पुस्तकाचा गौरव वाढविला आहे.

संस्तुति तयार करितांना ज्यांनीं उपयुक्त सूचना देऊन व लिखाणाचे संशोधन करून मला उत्साहित केले त्यांचा व "जीवन दर्शन" लिहितांना मला ज्या ज्या पुस्तकांचे साहाय्य लाभले त्या पुस्तकांचे लेखक, व संपादकांचा ही मी आभारी आहे.

तसेच श्रीसाधुवेला संस्कृत महाविद्यालयाचे संस्थापक आचार्य स्वामी श्री

गणेशदासजी महाराज व अध्यक्ष श्री स्वामी मस्तरामजी महाराज यांचा ही मी चिरकाल ऋणी व कृतज्ञ आहे, ज्यांच्या असीम कृपा प्रसादानें मला प्रस्तुत सारस्वत सेवा करण्याचा सुयोग प्राप्त झाला. त्यांच्या या उपकारांतून उत्तीर्ण होणे शक्य नसल्यामुळें त्या उपकारांचे स्मरण करणे मात्र माझ्या कडून शक्य आहे.

तसेच ज्यांच्या सहयोगानें, अनुरोधाने व प्रेरणेनें मला ही सेवा जनता-जनार्दनाचे हाती देता आली त्या श्रीगणेशचैतन्यशास्त्री, श्रीतुकाराम शास्त्री, श्री पंढरीनाथजी, श्रीस्वामी भुवनेश्वर यतिजी व स्वामी शिवशंकर भारती जी आदि सहयोगी जनांचे ही आभार मानणे मी माझे कर्तव्य समजतो; पण त्यांचे व माझे संबंध विचारांत घेता त्यांचे आभार मानणे औपचारिक ठरेल. प्रस्तुत पुस्तक त्यांचे माझ्या वरील प्रेमाचे द्योतक आहे, असे म्हटले तरी चालेल.

पुस्तक छपाईचे काम सुबक तऱ्हेनें व अल्पावधींत करून देणारे "हितचिन्तक प्रेस"चे मालक श्री के. कृ. पावगी यांनीं व त्यांच्या कामगारवर्गानें या कामीं परिश्रम घेतले, त्यांचा ही मी आभारी आहे.

ग्रन्थरूपानें अशा प्रकारे पुस्तक लिहिणे, हा माझा पहिलाच प्रयास आहे, त्यामुळें भाषेंत व रचनेंत दोष असणे स्वाभाविक आहे. विद्वज्जन व सुज्ञवाचक हंस-क्षीर न्यायानें ग्राह्य अंशाचा स्वीकार करून जे दोष असतील ते माझ्या निदर्शनास आणून देतील तर पुढच्या आवृत्तींत त्यांची अवश्य सुधारणा करिन.

शेवटी ज्यांच्या प्रेरणेनें व कृपा प्रसादानें या दोन्हीं कृती माझ्या कडून लिहून झाल्या, त्या सर्व परमार्थ प्रेमी जनांना प्रिय होवोत अशी भूतभावन भगवान् श्रीविश्वनाथां चे चरणकमलीं प्रार्थना करून श्री नाथरायांचे व श्री ज्ञानराज माऊलींचे स्मरण करून हे निवेदन पुरें करितो.

तुम्ही संत माझिया कडा । दिठीचा कराल बहुडा ।
तरि तुम्हां माने येवढा । होईन मी ॥ ज्ञाने० अ. १६।४७२.

वाराणसी;
माघ० शु०
२५ शके १८९०

आत्माराम शास्त्री बोरकर,

हरिः ॐ

# श्री सन्त एकनाथ जीवनदर्शन

ज्यांनी सुमारे ४०० वर्षांपूर्वी संस्कृत विद्येच्या माहेरघरीं श्री क्षेत्र काशीत मणिकर्णिका ( पंचगङ्गा ) घाटावर मन्दिर बांधून त्यांत भगवान् श्रीकृष्णांची मूर्ति स्थापन करून तेथें श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कन्धावरील आपली सरळ व सुबोध मराठी टीका पूर्ण करून "श्री रुक्मिणी स्वयंवर" नांवाचे ललित खण्डकाव्य लिहून तत्कालिन दक्षिणोत्तर भारतातील सांस्कृतिक, धार्मिक व आध्यात्मिक एकता सुदृढ केली, ते "श्री सन्त एकनाथ महाराज" महाराष्ट्रातील भागवतधर्म मन्दिराचे आधार स्तम्भ मानले गेले आहेत.

१२ व्या शताब्दि पासून १६ व्या शताब्दि पर्यन्त महाराष्ट्रातील सर्व वर्णांत, सर्व जातीत व निखिल उपजातींत समाजपथप्रदर्शक भवद्भक्त व साधु सन्त अवतीर्ण झाले. त्यांत काहीं स्वभावतः च भगवच्चरणानुरागी, ज्ञानी व निवृत्तिमार्गपरायण होते, उदा० श्रीसंत निवृत्तिनाथ महाराज, श्रीसन्त ज्ञानेश्वरमहाराज आदि. काहीं प्रवृत्तिमार्गावर आरूढ होऊन ही प्रपञ्च्यात अनासक्त राहून भगवंताची अनन्य भावानें उपासना करून निजजीवन व सामाजिकजीवन सफल करिते झाले, उदा० सन्त शिरोमणि नामदेव महाराज, श्रीसन्त सांवता महाराज, श्री गोरोबा काका आदि. पण ज्यांनीं गृहस्थाश्रम धर्माचे सम्यक् परिपालन करून व भगवंताची अनन्य भक्ति करून प्रपञ्च व परमार्थ यांचा अपूर्व समन्वय साधला, असे संत विरळेच होऊन गेले. अशा विरळ्या संतांत श्री एकनाथ महाराजांचे महत्त्वपूर्ण स्थान आहे.

ज्यांनीं परम पावनी भगवती गोदावरीच्या तटी विराजमान असलेल्या महातीर्थांत श्रीक्षेत्र प्रतिष्ठानांत ( पैठणांत ) शके १४५२ मध्ये[1] अवतीर्ण होऊन त्याकाळीं भगवद् भक्ति द्वारा दक्षिणोत्तर भारतांत भागवतधर्माचा प्रसार व प्रचार केला.

**प्रतिष्ठान ( पैठण ) ची प्राचीनताः—**

हेच ते महातीर्थ प्रतिष्ठान ( पैठण ) आहे, जेथील भगवती गोदावरीच्या तटीं विराजमान असलेल्या मन्दिरांत ब्रह्मदेवानें भगवान् श्रीकृष्णांच्या हस्ते त्यां-

---

१. वै. ह. भ. प. पांगारकरांनी नाथांचा जन्म शक १४५५ मानला आहे.

च्या पादुकांची स्थापना केली, या विषयीं खालिल जनश्रुति प्रसिद्ध आहे, ती अशी—

एकदां ब्रह्मदेवानें भगवान् श्रीकृष्णांचे दर्शन करण्याकरितां गोदावरीच्या तटावरील महातीर्थ श्रीक्षेत्र प्रतिष्ठान ( पैठण ) मध्यें अतिकठिण तप केले. यांच्या त्या तपानें सन्तुष्ट होऊन भगवान् श्रीकृष्ण ब्रह्मदेवाची इच्छा पूर्ण करण्यास तेथें प्रकट झाले. तेव्हां भगवान् श्रीकृष्णाची मोर मुकुट धारण केलेली सावळी मूर्ति पाहून ब्रह्मदेवास अतिशय आनंद झाला. त्यांनीं श्रीकृष्णांना विनंती केली की—'मला आपल्या या रूपाचे नित्य दर्शन व स्मरण व्हावेम्हणून आपण आपल्या पादुका येथें आपल्याच हातांनी स्थापन करा.'

तेव्हां भगवान् श्रीकृष्णांनीं ब्रह्मदेवाची ती विनंती मान्य करून आपल्या हातांनी आपल्या काष्ठपादुकांची स्थापना ( प्रतिष्ठानांत ) पैठणांत केली.[१]

**प्रतिष्ठानची ऐतिहासिकता :—**

प्राचीन काळातील प्राप्त झालेल्या शिलालेखादिकांच्या आधारे 'श्री सेतु माधवराव पागडी" आदि इतिहास संशोधकांनीं प्रकट केले आहे की—"श्री क्षेत्र प्रतिष्ठान इ० स० २००—२५० पूर्वी शककर्त्या शालिवाहनांची राजधानी होती." सुदूरपूर्वकाळीं भारताचे भ्रमण करणाऱ्या इजिप्त निवासी श्री पेरिप्लस यांनी आपल्या प्रवास वर्णनांत लिहिले आहे की – 'प्रतिष्ठान दक्षिण प्रदेशातील प्रसिद्ध-शहर आहे.' सुप्रसिद्ध भूगोलज्ञ श्री टालेमिया यांनी लिहिले आहे की—'प्रतिष्ठान मध्यें द्वितीय पुलुमावी राज्य करित होता" चालुक्य-राजपूतादिकांच्या वेळी ही प्रतिष्ठान समृद्ध व प्रसिद्ध होते, म्हणून त्याकाळीं ते 'भुक्तिक्षेत्र" वा "मुक्तिक्षेत्र" नांवने ही ओळखले जात होते. पोटणनगर, पोतनगर, पईठान, प्रत्यस्थान, पैठण आदि प्रतिष्ठानचीच नांवे होत. श्रीएकनाथ महाराजांच्या पूर्वकाळीं प्रतिष्ठान ( पैठण ) दक्षिणप्रदेशातील संस्कृत विद्यचे केन्द्र व वैदिक विद्यापीठ होते, म्हणून ते त्यांकाळीं "दक्षिण काशी" नांवानें ओळखले जात असे. सध्याही ते आपल्या गतवैभवानें औरंगावाद जिल्ह्यास अलंकृत करित आहे. जेथें श्री एकनाथ महाराजांचे पूर्वज रहात होते.

**श्रीएकनाथांचे पूर्वज—**

श्रीएकनाथ महाराजांचे प्रपितामह श्री भानुदास महाराज अश्वलायन शाखेचे ऋग्वेदी ब्राह्मण होते. त्यांच्या घराण्यांत परंपरागत भगवद्भक्ति चालत आली

१, आख्यायिका—"पैठण पहा"

होती, त्यामुळें सदाचार, परोपकार व सुशीलता आदि दैवीगुणांचा समुच्चय त्यांच्याही ठिकाणीं परिलक्षित होत होता. ते परम पावनी भगवती चन्द्रभागेच्या तटावर विराजमान असलेल्या श्रीक्षेत्र पंढरपुरातील त्रैलोक्य पालक भगवान् श्रीविष्णूंचे[1] व लीला पुरुषोत्तम भगवान् श्रीकृष्णांचे[2] प्रतिरूप महाराष्ट्राचे परमाराध्य दैवत, भगवान् श्री विठ्ठला ( पांडुरङ्गा ) चे अनन्य उपासक होते.

त्यांना चक्रपाणि नांवाचा मुलगा होता, तो ही भगवद्भक्त होता त्याच्या पुत्राचे नांव सूर्यनारायण होते. हे सूर्यनारायण भगवान् दिवाकरांची ( सूर्याची ) उपासना करित असत. तरी ही आपल्या घराण्यांत परंपरागत चालत आलेली श्रीक्षेत्र पंढरपुरची वारी व श्रीपांडुरङ्गाची भक्ति त्यांनी सोडली नव्हती. त्यांची सहधर्मचारिणी पत्नी श्री रुक्मिणीबाई भगवच्चरणानुरागिणी व पतिव्रता होती. पूर्वपुण्योदयानें तिच्या उदरी परम भगवदद्भक्त "उध्दव" श्रीएकनाथांच्या रूपानें विश्वकल्याणाकरितां शके १४५२ मध्यें जन्मास आले.

## एकनाथांचे पालन-पोषण—

श्रीएकनाथांच्या जन्मकाळीं मूळनक्षत्राचा योग होता. त्याच्या प्रभावाने बालपणींच एकनाथांची आई रुक्मिणीबाई व पिता सूर्यनारायण निज-धामास गेले, त्यामुळें एकनाथांच्या पालन-पोषणाचा भार त्यांचे आजोबा श्री चक्रपाणि यांजवर पडला. ६ व्या वर्षी त्यांचा यज्ञोपवीत संस्कार झाला. तेव्हां पासून श्री एकनाथ नित्य संध्या, भजन, पूजन व हरिकीर्तन श्रवण करूं लागले. श्री चक्रपाणीनीं त्यांना महाभारत, रामायण आदि ग्रन्थ शिकविले. त्यामुळें व घरच्या आचार-विचारांच्या प्रभावानें आणि सद्ग्रन्थांच्या श्रवणानेंश्रीएकनाथाची भगवद्भक्तीची आवड उत्तरोत्तर वाढत गेली नि त्यांच्यांत दया. क्षमा व परोपकारादि गुण वाढूं लागले.

## श्रीगुरुंची भेट व अनुग्रह—

काहीं दिवसांनीं त्यांना श्रीगुरुदर्शनाची उत्कट इच्छा झाली. त्याच सुमारास त्यांना दैवीदृष्टान्त ही झाला. तेव्हां आजोबांची परवानगी घेऊन ते श्रीगुरुंच्या शोधास निघाले नि फिरत फिरत "देवगिरि" नांवाचे पर्वतावर आले. पूर्वसुकृतोदयानें त्यांना तेथे शके १४६७ च्या सुमारास श्रीगुरुजनार्दन स्वामींचे दर्शन झाले. श्रीजनार्दन स्वामी भगवान् दत्तात्रेयांचे परम उपासक होते. त्यांचे तेजः पूंज शरीर व अलौकिक प्रतिभा पाहून श्रीएकनाथ जनार्दन स्वामींचे अनन्य सेवक

---

१. 'विठ्ठलो भगवान्विष्णुर्लीलाविग्रहवान्स्वयम्' वि० द० श्लो० ५

२. गीता जेणे उपदेशिली । ती ही विटेवरी माऊली ॥ तु० म०

झाले, नि काया-वाचा-मनानें त्यांची सेवा करूं लागले. जनार्दन स्वामींनीं एकनाथांची भक्ति व जिज्ञासा पाहुन त्यांस ज्ञानेश्वरी, गीता, अमृतानुभव, श्रीमद्‌भागवत आदि ग्रन्थ शिकविले.

श्री जनार्दन स्वामी भगवद्‌भक्त असून ही पूर्वकर्मानुसार देवगिरीच्या बादशहाचे दरबारी काम करित होते. एकदां जनार्दन स्वामींनीं एकनाथांस जमाखर्चाचा ताळमेळ पहाण्यास दिला. त्यांत त्यांस एक पै ची चूक आढळली. ती शोधण्याकरितां त्यांनीं एकाग्रतापूर्वक मध्यरात्रीपर्यन्त जागरण केले. जेव्हां त्यांना ती चूक सांपडली, तेव्हां साहजिकच त्यांना आनंद झाला व टाळी वाजवून त्यांनी तो अभिव्यक्त केला. त्यांच्या त्या टाळीचा आवाज ऐकून जनार्दन स्वामी जागे झाले. त्यांनी एकनाथांस टाळी वाजविण्याचे कारण विचारले, तेव्हां श्रीएकनाथांनीं सांगितले की—'जमाखर्चांतील सांपडत नसलेली एक पै ची चूक सांपडली, म्हणून मी आनंदाने टाळीं वाजविली'

व्यावहारिक कार्यातील एकनाथांची अशी तन्मयता व एकाग्रता पाहून जनार्दन स्वामींनीं त्यांचे कौतुक केले नि म्हणाले की—'जर तूं अशी तन्मयता व एकाग्रता भगवद्‌भक्तींत साधली तर तुझे कल्याण होईल.' नंतर काहीं दिवस अशाप्रकारे व्यतीत झाल्यावर एकनाथांची अनन्य भक्ति, एकाग्रता व स्वामीनिष्ठादि गुण पाहून श्री जनार्दन स्वामींनीं फाल्गुन वद्य षष्ठीस त्यांस अनुग्रह देऊन कृतार्थ केले.

### श्रीदत्तात्रेयांचे दर्शन व कृपा—

श्री जनार्दन स्वामींना भगवान् दत्तात्रेयांचा साक्षात्कार झाला होता. त्यांनीं श्रीएकनाथांची दिनचर्या व योग्यता पाहून निश्चय केला की—आता यास भगवान् दत्तात्रेयांचे दर्शन करविले पाहिजे, असा विचार करून एकें दिवशीं ते एकनाथांस आपल्या बरोबर घेऊन देवगिरीवरील त्या एकान्तस्थानीं गेले, जेथें त्यांना भगवान् दत्तात्रेय दर्शन देऊन कृतार्थ करित असत. तेथें गेल्यावर स्वामींनीं भगवान् दत्तात्रेयांची पूजा एवं आराधना केली. तेव्हां ब्रह्मतत्त्वाचे निदर्शन करणारे व करविणारे शान्त मुनि श्री दत्तात्रेय तेथे प्रकट झाले.

आपल्या श्रीगुरुंच्या सान्निध्यांत त्यांच्या परमगुरुंचे दर्शन झालेले पाहून श्रीएकनाथमहाराजांना अतिशय आनंद झाला. श्रीदत्तात्रेयांनीं ही एकनाथांचा भक्ति-भाव व सद्‌गुरुनिष्ठा पाहून त्यांस आशिर्वाद दिला नि नंतर ते अदृश्य झाले. श्रीमद्‌भागवताच्या अकराव्या स्कन्धाच्या नवव्या अध्यायांत नाथांनीं म्हटले आहे की—

देवो भावाचा भोक्ता । दृढ जाणोनि अवस्था ।
येणे जाहले श्रीदत्ता । तेणे हाथ माथा ठेविला ।।
पूजा विधि करोनि तया । जव जनार्दन लागला पाया ।।
तव अदृश्य जाहला दत्तात्रेया । योग मायेचेनि योगे ।।

श्री एकनाथ महाराजांनी श्रीदत्तात्रेयांच्या सगुण व निर्गुणात्मक स्वरूपाचे वर्णन आपल्या काव्यांत ठिकठिकाणीं केले आहे. श्रीमद्भागवतावर भाषा टीका लिहिण्याची प्रेरणा त्यांना श्री दत्तात्रेयांच्या कृपाप्रसादानें झाली. भागवताच्या पहिल्या अध्यायाचे नमनांत ते लिहितात—

आतां नमुं दत्तात्रेया । जो का आचार्यांचा आचार्या ।
तेणे प्रवर्तविले ग्रन्थकार्या । अर्थवावया निजबोधु ।।

ध्यानानुष्ठान—

श्रीएकनाथांस भगवान् दत्तात्रेयांचा आशिर्वाद प्राप्त झाल्यावर जनार्दन स्वामींनीं त्यांस परब्रह्म परमात्म्याच्या साक्षात्काराकरिता देवगिरिवरील प्रशान्त स्थानीं ध्यानानुष्ठान करण्यास सांगितले नि म्हणाले की—' जेव्हां तुला तेथे विशेष अनुभव येईल तेव्हां मला भेट." श्रीगुरुंची ही आज्ञा शिरसा वन्द्य मानून श्रीएकनाथ महाराज त्या स्थानावर जाऊन, अनुष्ठानाची जागा साफ करून तीच्यावर आसन घालून नित्य भगवंताची पूजा-अर्चना करून ध्यानानुष्ठान करूं लागले. त्यामुळें चित्त शुद्ध व वृत्ति स्थिर होऊन त्यांना श्रीकृष्ण परमात्म्याचे दर्शन झाले. आपल्या शरीराचा विसर पडला नि ते उत्तरोत्तर ब्रह्मानन्दांत निमग्न होऊं लागले.

पातंजल योगशास्त्रांत चित्तस्थिरतेकरितां जी साधनें सांगितली आहेत त्यांत "ध्यान" हे ही एक साधन सांगितलें आहे. श्रीपतंजलीचे सूत्र आहे की — "यथाभिमतध्यानाद् वा" ( पा० यो० १।३९ ) अर्थात् आपणास प्रिय असलेल्या श्री विष्णु-राम-कृष्ण आदि देवतांचे ध्यान केले असता चित्त स्थिर होते. चित्त स्थिर करण्याचे साधनांत आसनाचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. आसन सिद्ध झाल्यावर शीत-उष्ण, भूक-तहान इत्यादि द्वन्द्वांपासून पीडा होत नाही. असे पतंजलींनीं म्हटले आहे "ततोद्वन्द्वानभिघातः" पा० यो० सू० २।४८

श्रीएकनाथ महाराजांची ही स्थिति अशीच झाली. एकदा ते ध्यानांत निमग्न झाले असता दुपारची वेळ झाली. सूर्याच्या प्रखर किरणांनीं त्यांचे शरीर तापूं लागले, पण त्यामुळें त्यांची समाधि भंग झाली नाही. अशा वेळीं एक मोठा नाग फुत्कार करित त्यांच्या जवळ आला नि त्यानें एकनाथांच्या शरीराला

विळखा घातला. पण नाथांच्या शरीराचा स्पर्श होताच त्याची दुर्बुद्धि नष्ट झाली. तो नाग आपल्या फणीनें त्यांच्यावर छाया करून सूर्याच्या प्रखर तापापासून श्री एकनाथ महाराजांचे रक्षण करूं लागला.

चित्तशुद्ध झालेल्याच्या अवस्थेचे-स्थितीचे वर्णन करितांना श्रीसन्त तुकोबारायांनीं ही म्हटले आहे की—

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती।
व्याघ्र ही न खाती सर्प तया ॥

श्रीएकनाथ महाराजांची समाधि भंग झाल्यावर तो नाग तेथून निघून गेला. तेव्हां पासून तो नित्य तेथें येऊं लागला व नाथांचा मित्र बनला. जेव्हां जेव्हां एकनाथ म० समाधिमध्यें मग्न होत असत तेव्हां तेव्हां तो नाग त्यांच्यावर फणीनें छाया करून त्यांचे सूर्याच्या तापापासून रक्षण करूं लागला. हा प्रकार तेथें आसपास काम करणाऱ्या कामगारांनीं पाहिला. ते असे अलौकिक व अद्‌भूत् दृश्य पाहून आश्चर्यचकित झाले, नि त्यांनीं हा वृत्तान्त जनार्दन स्वामींना कळविला. नन्तर श्रीएकनाथ ही त्यांच्याकडे गेले नि त्यांना आपली स्थिति व अनुभव सांगितला. तो ऐकून त्यांची खात्री झाली की-आता एकनाथ धर्मप्रचारकार्य करण्यास योग्य झाला आहे. अतः यास विभिन्न तीर्थक्षेत्रांची यात्रा करित तेथील साधुसन्तांचे आशीर्वाद प्राप्त करून घेण्यास पाठविले पाहिजे. त्यामुळें त्यास सहजच विभिन्न प्रदेशातील संस्कृतींचें व आचार-विचारांचे ही ज्ञान होईल.

**श्रीएकनाथांची तीर्थयात्रा—**

वरील विचारानुसार श्री जनार्दन स्वामी एकनाथांस बरोबर घेऊन श्रीक्षेत्र नासिकमध्यें आले. तेथें त्यांनी त्यांस भगवान् श्रीरामचन्द्रांचे दर्शन करविले नि चतुश्लोकी भागवतावर भाषा टीका लिहिण्यास सांगितले. तदनुसार श्रीएकनाथांनीं थोडचाच दिवसांत तेथें चतुश्लोकी भागवतावर सुबोध मराठी टीका लिहिली. ती वांचून जनार्दन स्वामींना फार समाधान वाटले. नंतर ते त्यांस घेऊन श्रीक्षेत्र त्र्यम्बकेश्वरी आले. तेथें त्यांनीं भगवान् त्र्यम्बकेश्वरांची, श्रीसन्त निवृत्तिनाथांच्या समाधीची व गोदावरीच्या उद्‌गमस्थानाची पूजा-अर्चना करून पुण्यतम ब्रह्मगिरीची प्रदक्षिणा केली. नंतर त्यांनी एकनाथांस उत्तरप्रदेशातील तीर्थांची माहिती सांगून अयोध्या, मथुरा, वृन्दावन आदि तीर्थक्षेत्रांची यात्रा करण्यास पाठविले.

इकडे पैठणमध्यें एकनाथांचा बरेच दिवस समाचार न मिळाल्यामुळें त्यांचे आजोबा व आजी चिन्तातूर झाले होते. एक दिवशीं अकस्मात् त्यांची व श्रीजनार्दन स्वामींची भेट झाली नमस्कारादि शिष्टाचार झाल्यावर चक्रपाणींनीं त्यां-

त्याकडे एकनाथांची चौकशी केली. व त्यांना आपली स्थिति सांगितली. ती ऐकून जनार्दन स्वामींनीं त्यांना एकनाथांचा समग्र वृत्तान्त सांगितला नि म्हणाले— "मी एकनाथास तीर्थयात्रेहून आल्यावर प्रथम आपली भेट घेण्यास सांगितले आहे. तदनुसार तो आपली भेट घेण्यास जेव्हां येईल तेव्हां त्यास मी देत असलेली चिट्ठी द्या." असे म्हणून त्यांनी चक्रपाणीं जवळ एकनाथांस देण्यास एक चिट्ठी लिहून दिली. त्यांत त्यांनी नाथांस लिहिले की—'जेथे' ही चिट्ठी आपणास मिळेल; तेथें यात्रा संपवावी. नि लिहिल्याप्रमाणें विवाह करून गृहस्थाश्रमाचे पालन करावे'

काहीं दिवसांनी श्रीएकनाथ महाराज उत्तरप्रदेशातील अयोध्या, मथुरा, बद्रीनाथ-केदारनाथ आदि तीर्थांची यात्रा करून द्वारकेत भगवान् श्रीकृष्णांचे व गिरनार पर्वतावर भगवान् दत्तात्रेयांचे दर्शन करून परत पैठणास आले नि आजा-आजींना भेटले. फार दिवसांनीं एकनाथांची भेट झाल्यामुळें त्या दोघांना अतिशय आनंद झाला. क्षेम-कुशलादि विचारल्या नंतर त्यांनीं त्यांस श्रीगुरु जनार्दन स्वामींची चिट्ठी दिली. ती वांचल्यावर "आज्ञा गुरूणामविचारणीया" (श्री गुरुंच्या आज्ञेवर विचार करूं नये) या सूक्तिवचनानुसार त्यांनीं आपली तीर्थयात्रा तेथेच संपविली नि विवाह करण्याची संमति आजाआजींना दिली.

## गृहस्थाश्रम व स्वधर्मपालन—

काहीं दिवसांनीं विजापुर वा वैजापुर येथील सम्पन्न ब्राह्मणाच्या सुलक्षण व सुरूप कन्येबरोबर एकनाथांचा विवाह झाला. त्यांच्या पत्नीचे नांव गिरिजाबाई होते, गिरिजाबाई स्वभावानें प्रेमळ, सुशील व सर्वगुणसम्पन्न असून भगवच्चरणानुरागिणी होती. त्यामुळें परस्परांच्या विचारानें ते भगवंताची उपासना करित, वेदविहित व स्मृति- प्रतिपादित गृहस्थाश्रमधर्मांचे विधिवत् पालन करित, निष्काम भावनेनें परोपकार, अतिथिसेवा आदि करित प्रपंच नि परमार्थ करूं लागले. त्यांच्या त्या निष्काम सेवेनें व अनन्य भक्तिनें भगवान् श्रीहरि सन्तुष्ट होऊन आपणास ते एकनाथांचे ऋणी समजुं लागले. तेव्हां नाथांच्या या भक्तिऋणातुन अंशतः मुक्त होण्याकरितां भगवान् श्रीहरींनीं 'श्रीखण्डया' नांव धारण करून व सेवकरूपानें नाथांच्या घरी येऊन १२ वर्षे पर्यन्त कावडींनीं पाणी भरले. "केशव" नांव धारण करून १२ वर्षे पर्यन्त त्यांस देवपूजेकरितां चन्दन घासून दिले "उद्धव" नांव धारण करून नाथांच्या कीर्तनांत साथ केली. सकळ सिद्धींचा दाता, त्रैलोक्यप्रतिपालक भगवान् ज्यांची प्रेमानें सेवा करितात त्यांच्या भाग्याचे मी काय वर्णन करावे ?

अशा श्रीएकनाथ महाराजांच्या घरीं सदावर्त व हरिकीर्तन सदा ही होत असे. त्यामुळें त्यांची कीर्ति सर्वत्र पसरूं लागली, यथासमयीं त्यांना दोन कन्या झाल्या,

त्यांची नांवें अनुक्रमें गंगा व गोदावरी ठेवण्यांत आली. कालान्तरानें त्यांना मुलगा झाला. त्याचे नांव "हरि" ठेवण्यात् आले. "शुद्ध बीजा पोटी । फळें रसाळ गोमटी" ( तु० म० ) या प्राकृतिक नियमानुसार हरि लहानपणापासूनच बुद्धिमान् व प्रतिभासम्पन्न होता, म्हणून श्रीएकनाथांनीं त्यास शास्त्राध्ययन करण्यास श्रीक्षेत्र काशीस पाठविले. तेथे गेल्यावर हरिनें तेथील शास्त्रज्ञपण्डितांकडून अनेक शास्त्रांचे अध्ययन केले नि लवकर च तो त्यांत प्रवीण झाला व परत पैठणला आला. त्याचे प्रखर पाण्डित्य व प्रगल्भ बुद्धि पाहून नाथांना समाधान वाटले. सर्व लोक आश्चर्यचकित झाले नि ते हरिस "हरिपण्डित" नावानें संबोधु लागले.

श्रीएकनाथ महाराजांचे घरीं अन्नदान, अतिथि सेवा व ज्ञानसत्र चालू होते च त्यांत ही वाढ़ होत गेल्यामुळें दिवसें दिवस त्यांच्यांत परोपकार—दया, क्षमा, शान्ति, सहृदयता, सहनशीलता, समदर्शिता, विरक्ति व भक्तिभावादि अनेक दैवीगुण वाढू लागले ज्यांची अभिव्यक्ति नाथांच्या आचार-विचारां द्वारा होवूं लागली वरील सद् गुणांची अभिव्यक्ति करणाऱ्या अनेक घटना श्रीएकनाथ महाराजांच्या जीवनांत घडून आल्या जर त्या सर्वांचे च विवेचन करूं लागलो तर तो एक स्वतन्त्र ग्रन्थच होईल म्हणून त्यांच्या जीवनातील ज्या घटना व्यावहारिकांना व पारमार्थिकांना ही उद्‌बोधक व मार्गदर्शक आहेत; त्या गुणानुसार थोडक्यांत येथें देण्यात येत आहेत.

### श्री एकनाथांची भूतदया—

एकदां श्रीएकनाथ महाराज काशीहून आणलेले गंगाजल घेऊन भगवान् श्रीरामेश्वरांचा अभिषेक करण्याच्या उद्देश्यानें श्री क्षेत्र रामेश्वरला जाण्यास निघाले त्यांच्या बरोबर इतरही भक्तमण्डळी निघाली. काहीं दिवस चालून गेल्यावर एकें दिवशीं दुपारी त्यांना वाटेवर एक गाढव तडफडत असलेले दिसले त्यास पाणी पिण्यास न मिळल्यानें ते कासाविस होऊन जमीनीवर पडून तळमळत होते. त्याची ती दशा पाहून श्रीएकनाथांना त्याची दया आली. त्यांनीं विचार केला की —ईश्वर सर्वभूतमात्रात स्थित आहे किंवहुना सर्वभूतें ईश्वराचीच रूपें होत. यास्तव यावेळी जर यास पाणी पाजले नाही तर ह्याचा प्राण जाईल. जसा माझा प्राण मला प्रिय आहे तसा ह्याचा ही प्राण यास प्रिय असेल, म्हटले ही आहे की —

प्राणा यथाऽऽत्मनोऽभीष्टा भूतानामपि ते तथा ।
आत्मौपम्येन भूतेषु दयां कुर्वन्ति साधवः ॥

महा० अनु० प० अ० ११५ श्लो० २१-

अर्थात् जसे आपणास आपले प्राण प्रिय आहेत तसे सर्व जीवांना ही आप-आपले

प्राण प्रिय असतात, असे समजून साधु-सन्त सर्वप्राण्यांवर दया करितात.

तदनुसार जर ह्यास पाणी पाजले नाही तर ह्याचा आत्मा दुःखी होईल-पर्यायानें ते दुःख मला ही सोसावे लागेल,कारण "ममात्मा सर्वभूतात्मा" माझा आत्मा सर्वभूतांचा आत्मा आहे. यास्तव भगवान् रामेश्वरांच्या अभिषेकार्थ चालविलेले पाणी ह्यास पाजून यास सन्तुष्ट केले तर ती सुद्धा भगवान् रामेश्वरांचीच पूजा होईल, म्हटले ही आहे की

येन केनाप्युपायेन यस्य कस्यापि देहिनः।
सन्तोषं जनयेत् प्राज्ञः तदेवेश्वरपूजनम् ॥

सु० भा० र० २१

अर्थात् कोणत्याही प्राण्याच्या शरीराचा, स्वभावाचा वा गुणाचा विचार न करितां कोणत्याही उपायानें त्यास सन्तुष्ट करणे ही ईश्वरचीच पूजा होय.

श्री एकनाथ महाराजांनीं ही असे मानून कावडीतील पाणी त्या गाढवास पाजून त्याचे प्राण वांचविले नि धन्य झाले. म्हटले ही आहे की—

यस्य चित्तं द्रवीभूतं कृपया सर्वजन्तुषु।
स धन्यः संसृतौ पुण्यः..............।

ब्र० वै० पु० अ० ३५ श्लो० ७२.

अर्थात् ज्याचे चित्त सर्वप्राण्यांच्या दुःखानें द्रवीभूत होते तो जगांत पुण्यवान् व धन्य आहे.

वरील विवेचनावरून श्री एकनाथमहाराज जसे धन्य व पुण्यवान् होते, तसे ते सहृदयी ही होते.

## एकनाथांची सहृदयता—

श्री एकनाथ महाराज प्रतिदिन त्रिकाळ स्नानसन्ध्या करित असत. एकदा उन्हाळयाचे दिवसांत ते मध्यान्हकाळीं स्नान करून घरीं परत येत असतां त्यांना गोदावरीच्या तप्त वाळवंटांत एक मूल रडत असलेले दिसले. त्याचे अंगावर कपडे वगैरे नव्हते. त्यामुळें सूर्याच्या तापानें त्याचे शरीर व तापलेल्या वाळूनें पाय पोळत होते. पण आई आदि कोणीही जवळ-पास नसल्यानें ते स्फुन्दून स्फुन्दून रडत होते. त्या रस्त्यानें अनेक लोक येत-जात होते. पण त्याचे केविलवाणे रडणे ऐकून कोणासही त्याची कीव आली नाही. कारण ते मूल अन्त्यजाचे होते. पण "लहान मूले परमेश्वराच्या उद्यानातील सुमनोहर फुले होत" असे मानणाऱ्या श्री एकनाथ महाराजांचे हृदय त्यास पाहून कळवळले—त्यांच्या हृदयातील वात्सल्यभाव जागृत झाला; लगेच ते त्या मुलाजवळ गेले नि त्यास उचलून आपल्या

खांद्यावर घेतलें प्रेमाने त्यास गोंजारले नि शान्त केले. नंतर त्याच्या घरीं नेऊन सुखपूर्वक त्यास त्याच्या माता-पित्यांचे स्वाधीन केले.

श्री एकनाथ अन्त्यजाचे मूलास खांद्यावर घेऊन त्याच्याघरीं गेले; हे पाहून स्वतःस सनातनी म्हणवून घेणारांनीं त्यांची निंदा केली व सहृदयीं जनांनीं त्यांचे उपकार मानून त्यांना धन्यवाद दिले.

श्री एकनाथ महाराज जसे दयावान्, सहृदयी नि उदार होते तसे क्षमावान् ही होते.

**एकनाथांची क्षमा—**

कोणी शारीरिक अथवा मानसिक कष्ट दिले तरी त्याच्यावर क्रोध न करणे अथवा त्यास न मारणे "क्षमा" होय, असे क्षमेचे लक्षण अत्रिस्मृतींत केले आहे—

**बाह्ये वाऽभ्यन्तरे चैव दुःखे चोत्पादिते क्वचित् ।**
**न कुप्यति न वा हन्ति सा क्षमा परिकीर्तिता ॥** अ० स्मृ० ३९

अशीच क्षमा श्रीएकनाथ महाराजांच्या अंगी पूर्णतः बाणली होती; असेच जणुं त्यांच्या खालील घटने वरून प्रत्ययास येते, ती घटना अशी—

श्रीएकनाथ महाराज प्रतिदिन गोदावरी वर स्नानास जात असत. स्नान करून घरीं परत येण्याच्या त्यांच्या वाटेवर एका यवनाचे घर होते. तो यवन एकनाथमहाराजांची अतिथिसेवा, परोपकार, अन्नदान व ज्ञानदानानें उत्तरोत्तर उन्नति पथावर असलेली कीर्ति व प्रतिष्ठा पाहून नेहमीं मनांत जळत असे, कारण दुष्टांचा स्वभावच असा असतो. महाकवि माघांनीं म्हटले आहे की—सज्जन लोक स्वभावतः सदा सर्वांवर उपकार करितात नि उन्नत होतात तरी ही त्यांची ही उन्नति दुष्टांच्या हृदयास शूळा सारखी टोचत असते, म्हणून ते सदा त्यांचा द्वेष करितात—

**उपकारपरः स्वभावतः सततं सर्वजनस्य सज्जनः ।**
**असतामनिशं तथाप्यहो गुरुहृद्रोगकरी तदुन्नतिः ॥** शिशु० पा०

हा यवनही अशाच वृत्तीचा होता. एके दिवशी श्रीएकनाथ महाराज स्नान करून त्याचे घरा समोरून चालले असतां त्यानें खाल्लेल्या पानांच्या थूंकीची पिचकारी नाथांच्या अंगावर सोडली. तरी ते यत्किंचित ही त्याच्यावर रागावले नाहीत. उलट पुनः गंगा स्नानाचा लाभ घडविला म्हणून त्यास धन्यवाद देऊन पुन. स्नानास गेले.

सन्तांचा स्वभावच असा असतो. म्हटले ही आहे की—कधी ही मर्यादेचे उल्लंघन न करणारे, उत्तम स्वभाव असलेले साधु सन्त कोणाच्या अपराधाचे

स्मरण करित नाहीत, ते उपकाराचेंच स्मरण करितात —

**न स्मरन्त्यपराद्धानि स्मरन्ति सुकृतान्यपि।**
**असंभिन्नार्थमर्यादाः साधवः पुरुषोत्तमाः॥**

महा० भा० आ० प० अ० १२ श्लो० ३२

म्हणून जसे सन्त-सज्जन परोपकार करण्यांत सदा तत्पर असतात तसे दुर्जन लोक परापकार करण्यांत सतत तत्पर असतात—

**यथा परोपकारेषु नित्यं जागर्ति सज्जनः।**
**तथा परापकारेषु जागर्ति सततं खलः॥** सु० भा० र०

असेच झाले. श्रीएकनाथ महाराज स्नान करून परत आल्यावर त्या दुष्ट यवनानें पुनः तशीच दुष्टता केली. अशा प्रकारे त्यानें १०८ वेळा एकनाथांच्या अंगावर थुंकून त्यांची शान्ति भंग करण्याचा प्रयत्न केला. पण नाथांवर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. कारण ते वस्तुतः साधु होते. पुराणामध्यें साधुचें लक्षण असे केले आहे - कोणी दण्डादकांनीं अथवा शब्दबाणांनीं मारल्यावर ही ज्यास क्रोध येत नाही, तो साधु म्हटला जातो[1]—

**यस्तु दुष्टैस्तु दण्डाद्यैर्वचसाऽपि च ताडितः।**
**न च क्षोभमवाप्नोति स साधुः परिकीर्त्यते॥** ब्र० पु० ३-११.

श्रीएकनाथ महाराज अशा प्रकारचे क्षमाशील साधु होते, म्हणून ते त्या यवनावर रागावले नाहीत. त्यामुळें आपण केलेल्या दुष्कृत्यानें तो यवनच लज्जित झाला. होणारच ! आकाशांत धूळ फेकली तर ती फेकणाऱ्याचे डोक्यावर पडेलच—

**'खे भूलिं यस्त्यजेदुच्चैर्मूर्ध्नि तस्यैव सा पतेत्"**

दिव्याचा उज्ज्वल प्रकाश पाहून पतंग त्याच्यावर आक्रमण करून त्यास मालवूं पहातो, पण त्यामुळें दिवा तर विझत नाहीच उलट पतंगच आपल्या कृतीनें प्राणास मुकतो (**पतंगा दीप्ति आलिंगन। तेथ त्यासी अचूक मरण"** ज्ञाने० ) म्हणून म्हटले आहे की—मनुष्य दुसऱ्यास जे काहीं सुख अथवा दुःख देतो तेच त्या मनुष्यास परत मिळते—

---

१. [ याचा अर्थ-ज्यास दण्डाने मारले असता, तो प्रतिकार न करितां निमूट पणे सहन करितो तोच साधु असतो असा नव्हे. दण्डांचा मार तर चोर-डाकू-गुण्डे लोक ही निमूटपणे सहन करितात. मग त्यांना हा साधु म्हणावे लागेल. पण समाजांत त्यांस साधु मानले जात नाही. यावरून असेंच मानावे लागेल की— साधुस दण्डानें मारले तर ते प्रतिकार न करितां सहन करून ते साधुत्वाचा परिचय देतील; पण यावरून साधुंना दण्डानें मारून त्यांच्या साधुत्वाची परीक्षा घ्यावी असे ही समजुं नये. ]

सुखं वा यदि वा दुःखं यत्किंचित् क्रियते परे।
ततस्तु तत्पुनः पश्चात् सर्वमात्मनि जायते ॥

दक्षसंहिता अ० ३.

या यवनाचे ही असेच झाले. त्यानें श्रीएकनाथमहाराजांचे पाय धरले नि त्यांच्या जवळ क्षमा मागुं लागला. तेव्हां एकनाथ म० म्हणाले 'आपल्या कृत्यानें आज मला किती तरी वेळा गंगास्नानाचा लाभ झाला, म्हणून आपणच धन्यवादास पात्र आहात' असे म्हणून नाथांनीं त्यास कृपाप्रसाद देऊन कृतार्थ केले ( यवन **अंगावरीं थुंकला । प्रसाद देऊनि मुक्त केला** ) असे करण्यांत त्याच्या साधुत्वाचे ही रक्षण झाले. ब्रह्मपुराणांत म्हटले आहे की—

ताडयेत्ताऽडयन्तं यो न च साधुः स पापभाक्।
क्षमया ऽर्हणता प्राप्ताः साधवो ब्राह्मणा वयम् ॥ ब्र० पु० ३।३१।१९.

अर्थात् जो मारणारास परत मारतो; तो साधु नाही तो पापी आहे, कारण साधु व ब्राह्मण क्षमावान् असतात म्हणूनच जगांत पूज्य मानले जातात. सुभाषितकारांनीं म्हटले आहे की —

स्वभावं न जहात्येव साधुरापद्गतोऽपि सन्।
कर्पूरः पावकं स्पृष्टः सौरभं लभतेतराम् ॥ सु० भा० र०

अर्थात्—आपत्तीत पडल्यावरही साधु-सन्त आपला स्वभाव सोडीत नाहीत. कापूरास अग्नीनें स्पर्श केला तर तो अधिकच सुगन्ध पसरवितो.

श्रीएकनाथ महाराजांनीही असेच आचरण केले. त्यांनीं यवनाच्या दुष्कृत्याचा बदला न घेता त्यास प्रसाद देऊन कृतार्थ केले नि त्याद्वारा समाजास शिकवण दिली की—जर कोणी आपणास कुत्सित भावनेनें बरे-वाईट म्हटले तर आपण त्यास त्याच भावनेनें बरे-वाईट म्हणुं नये; त्यास क्षमा करावी. असे केले असता क्षमा करणाराचे आंत असलेला क्रोध त्या बरे-वाईट बोलणाराचा नाश करितो, मग त्याच्या सर्व सत्कर्माचे फल क्षमा करणारास मिळते—

आक्रुश्यमानो नाक्रोशेन्मन्युरेव तितिक्षतः।
आक्रोष्टारं निर्दहति सुकृतञ्चास्य विन्दति ॥

महा० भा० अ० २९ श्लो० १६.

अशी क्षमा करणाऱ्यांत फक्त एकच दोष आहे, तो हाच की – क्षमा करणारास ( बाळगणारास ) लोक दुर्बळ-अशक्त समजतात—

एकः क्षमावतां दोषो द्वितीयो नोपपद्यते।
यदेनं क्षमया युक्तमशक्तं मन्यते जनः ॥ आपस्तंभस्मृति अ० १०।५

पण साधु सन्त म्हणतात की— जो लोकांत कल्याणदायक सद् व्यवहार

करतो त्याच्या त्या व्यवहाराची विशेषता काय ? अपकार करणाऱ्यावर ही जो उपकार करितो तोच साधु होय—

उपकारेषु यः साधुः साधुत्वे तस्य को गुणः ।
अपकारेषु यः साधुः स सद्भिः साधुरुच्यते ॥

जै० अश्व० अ० ११ श्लो० ३९

म्हणून महाभारतकार म्हणतात की—क्षमा करणारा दुर्बळ आहे, अशक्त आहे असे मानू नये, कारण क्षमा करणे हेंच त्याचे परम बल आहे. ज्याचे हातांत क्षमारूपी शस्त्र व शान्तिरूपी खड्ग आहे त्याला दुर्जन काय करिल ?—

सोऽस्य दोषो न मन्तव्यः क्षमा हि परमं बलम् ।
क्षमा शस्त्रं करे यस्य दुर्जनः किं करिस्यति ॥
शान्तिः खड्गं करे यस्य दुर्जनः किं करिष्यति । महाभा० ३३।४९

श्रीएकनाथ महाराज ह्याचे मूर्तिमन्त उदाहरण आहे असे म्हटले तर अत्युक्ति होणार नाही. श्रीनाथ महाराज जसे दयावान्, क्षमावान् व सहृदयी होते, तसे सहनशील ही होते.

## एकनाथांची सहनशीलता—

पृथ्वीच्या पाठीवर प्रकृतीच्या गुणवैचित्र्यामुळे भिन्न भिन्न स्वभावाचे लोक रहातात. त्यांत जे दया, क्षमा आदि गुणांनीं अलंकृत असतात ते 'सज्जन" या नांवानें व काम-क्रोधादि दुर्गुणांनीं युक्त असलेले "दुर्जन" या नांवानें ओळखले जातात. दुर्जन लोक आपल्या स्वभावानुसार जसे दुष्कर्माचे आचरण करितात, तसे ते सज्जनांचाही द्वेष करितात. कारण त्या विना त्यांचे समाधान च होत नाही. म्हटले ही आहे की—

न विना परतापेन रमते दुर्जनो जनः । सु० भा० र० श्लो० २१.

श्रीएकनाथ महाराजांच्या समयीं ही असे लोक पैठण मध्यें होते. ते गांवाच्या वेशी वरील ओटचावर बसून गांवांत येणाऱ्या-जाणाऱ्यांची चौकशी करून आपले काम करित असत.

एकदां एक ब्राह्मण आपल्या मुलाचे उपनयन संस्कारा करितां धन मिळविण्याच्या इच्छेनें पैठण मध्यें आला. तोच त्यानें वेशीतील ओटचावर बसलेली मण्डळी पाहिली नि तो त्यांच्याकडे गेला. नमस्कार, क्षेम-कुशल आदि औपचारिक शिष्टाचार झाल्यावर त्यानें आपले येण्याचे प्रयोजन त्यांना सांगितले. ते ऐकून ( त्याचा पोशाख व व्यवहार पाहून ) त्याच्या स्वभावाची पारख करून ते त्यास म्हणाले की—

"आपले कार्य महत्त्वाचे आहे. म्हणून आम्ह आपली सहायता करूं, पण त्या करितां आमची एक अट आहे ती अशी – येथे गांवांत एकनाथ नांवाचे ब्राह्मण रहातात. ते आपणास सन्त म्हणवितात. त्यांच्याकडे जाणारे लोक म्हणतात की—"त्यांना क्रोध येतच नाही." अतः जर आपण त्यांना क्रोधित कराल तर आम्हीं आपली इच्छा पूर्ण करू"

त्यांची ती अट ऐकल्यावर त्या ब्राह्मणानें मागचा पूढचा कांही एक विचार न करितां हे कार्य सोपे आहे असे समजून त्यांची ती अट मान्य केली नि एकनाथ महाराजांच्या घराचा मार्ग विचारून त्वरेनें तो त्यांच्या घरीं पोहचला. त्यावेळीं एकनाथ महाराज घरातील देवालयांत इष्ट देवतांची षोडशोपचारें पूजा करित होते. त्यांना पूजा करित असलेले पाहून 'ह्यांना क्रोधित करण्यास हा सन्धि उत्तम आहे' असा विचार करून तो ब्राह्मण सामान वगैरे बरावर घेऊन पायांतील जोड्यांसह न विचारताच देवळांत गेला.

श्रीएकनाथ महाराज नांवाप्रमाणे "नाथ च" होते. त्यांनीं त्यास अशा प्रकारे आपल्या समोर आलेले पाहून ही क्रोधित न होता, त्यास नमस्कार केला नि क्षेम-कुशल विचारले. तेव्हां तो ब्राह्मण म्हणाला—मी आपल्याच दर्शना करितां आलो आहे. समाधान झाले माझे आपल्या दर्शनानें.

त्याचे ते बोलणे ऐकून श्रीएकनाथ महाराज त्यास म्हणाले की - "अहाहा ! किती उत्कट उत्कण्ठा लागली होती आपणास माझ्या दर्शनाची ! येथें येताच आपणास पायांतील जोडे बाहेर काढून ठेवण्याचे ही भान राहिले नाही. धन्य अहात आपण. बसा थोडावेळ. सामान ठेवा नि प्रसाद घेऊन आराम करा."

श्रीएकनाथ महाराजांचे हे भाषण ऐकून ब्राह्मण खिन्न झाला नि मनांत विचार करूं लागला की—जसे गवताच्या प्रज्वलित आगीनें समुद्र कधीच तापविला जाणे शक्य नाही, तसे साधुस क्रोधित करण्याचा प्रयत्न केला तरी ही त्यांचे मन विकृत होत नाही अर्थात् त्यांना क्रोध येत नाहीं—

**साधोः प्रकोपितस्याऽपि मनो नायाति विक्रियाम् ।**
**नहि तापयितुं शक्यं सागराम्भस्तृणोल्कया ॥**— पंचतन्त्र.

ही उक्ति खरोखर सत्य आहे. पण यांना क्रोधित केल्या शिवाय आपणास पैसे मिळणार नाहीत, म्हणून पुनः प्रयत्न करून पहावा. असा विचार करून तो ब्राह्मण तेथेच थांबला.

पूजा विधि आटोपल्यावर श्रीएकनाथ महाराजांनीं त्यास आपल्याबरोबर जेवणास बोलाविले. त्यावेळीं त्या ब्राह्मणानें मनांत विचार केला की — आता असे

वर्तन करावे, की जेणें करून यांना क्रोध आलाच पाहिजे, म्हणून तो अशा संधीची वाटच पहात राहिला.

थोडया वेळाने श्री गिरिजावाई जेवणाची दोन ताटें वाढून घेऊन आल्या. त्यांनीं ती ताटें त्या दोघांच्या पूढे ठेवली. त्या दोघांनीं जेवणास आरंभकेला. जेव्हां ताटांतील खावून संपलेले पदार्थ पुन: वाढण्यास गिरिजावाई ओणव्या झाल्या, तेव्हां तो ब्राह्मण जेवण सोडून चटकन उडीमारून गिरिजावाईंच्या पाठीवर बसला. तो एवढयाच करितां की—आपल्यापत्नीची आपल्या समोर परक्या माणासाने चेष्टा केल्याचे पाहिल्यावर एकनाथांना निश्चितच राग येईल.

पण श्रीएकनाथ महाराज नांवा प्रमाणे एकनाथच नव्हे तर सनाथ ही होते. यास्तव त्याचे ते कृत्य पाहून ते गिरिजाईंना म्हणाले—"हे पहा! अतिथींना सांभाळा! त्यांना त्रास होऊं देऊं नका! नि खाली ही पाडूं नका!

गिरिजावाई सुद्धां एकनाथांच्या पत्नी होत्या. त्यांचे ते उग्दार ऐकून त्या म्हणाल्या—"आपण काळजी करूं नका. आपल्या हरिपंडितास कधी कधी पाठीवर घेऊन मला वाढण्याची संवय झाली आहे. जसे मी त्यास कधी पाठीवरून पडूं दिले नाही तसे यांनाही पडूं देणार नाही नि पाडणार ही नाही."

त्या दोघांचा अशा हा संवाद ऐकून ब्राह्मण च लज्जित झाला. नि मनांत समजला की—जसे तेजस्वी रत्नदीपाच्या ज्योतीस प्रलयकालची हवा ही मालवूं शकणार नाही, तसे गुणवानांची स्थिर शैली ( स्थिरवृत्ति ) मूर्ख मनुष्य आपल्या बुद्धिनें विचलित करूं शकणार नाही—

**स्थिरशैली गुणवतां खलबुद्धया न बाध्यते ।**
**रत्नदीपस्य हि शिखा वात्यया ऽपि न नाश्यते ॥**

सु० भा० र० ४।११

हे म्हणणे खरेंच आहे. म्हणून आता ह्यांची माफी मागावी. असा विचार करून तो काकूलती येऊन श्रीएकनाथ महाराजांचे पाय धरून त्यांच्या कडे क्षमा मागुं लागला.

जेव्हां श्रीएकनाथ महाराजांनीं त्यास असे करण्याचे कारण विचारले तेव्हां त्यानें आपला निखिल वृत्तान्त त्यांस स्पष्ट सांगितला. तो ऐकून श्रीएकनाथ महाराज त्यास म्हणाले असतील की—महाभारतांमध्यें श्री व्यासांनी म्हटले आहे—

**क्रोधः शत्रुः शरीरस्थो मनुष्याणां द्विजोत्तम !**

महा० वन० प० अ० ३ श्लो० २०९

हे द्विजोत्तम! क्रोध प्राण्यांच्या शरीरांत राहाणारा महान् शत्रु आहे. क्रोधाच्या परिणामा विषयीं अध्यात्म रामायणांत म्हटले आहे की—

**क्रोधो मूलमनर्थानां क्रोधः संसारवर्धनः।**
**धर्मक्षयकरः क्रोधस्तस्मात् क्रोधं विवर्जयेत् ॥**

अ० रा० अ० का० ४।१६

क्रोध सर्व अनर्थांचे मूळ आहे. क्रोध प्रपंच वाढविणारा आहे. क्रोध धर्माचा क्षय करणारा आहे. म्हणून क्रोधाचा सर्वथा परित्याग करावा.

**ज्ञानयोगतपो तस्य यज्ञदानानि सत् क्रिया।**
**क्रोधनस्य वृथा यस्मात्तस्मात् क्रोधं विवर्जयेत् ॥**

भ० पु० ब्रा० प० अ० १७१ श्लो० ४८.

अर्थात् क्रोध करणाऱ्या पुरुषाचे ज्ञान, योग, तप, यज्ञ व दानादि सर्व सत्क्रिया व्यर्थ जातात. म्हणून क्रोधाचा सदा परित्याग करावा असे अनेक शास्त्रकारांचे मत आहे नि ते सत्य ही आहे. म्हणून मी कधी कोणावर क्रोध करित नाही.

त्यांचे ते भाषण ऐकून तो ब्राह्मण त्यांना म्हणाला असावा की—"माझा अशा प्रकारचा व्यवहार पाहून तरी आपणास क्रोध यावयास हवा होता."

त्याचे ते बोलणे ऐकून श्रीएकनाथ महाराज त्यास म्हणाले असतील; की— आत्मपुराणांत म्हटले आहे —

**सर्पाणाञ्च शूनां वा को विशेषो विदुषां भवेत् ।**
**अपकारिणि चेत्कोपं कुर्वन्ति ज्ञानिनोऽपि च ॥**

आत्म० पु० अ० ४ श्लो० ७३.

अर्थात् जर ज्ञानी-विद्वान ही अपकार करणारांवर क्रोध करूं लागले; तर सर्प व कुत्र्यांहून त्यांची विशेषता काय ? कारण अपराध करणावर सर्प व कुत्रीही क्रोध करितात. म्हणून म्हटले जाते की—जे बुद्धिमान् लोक आपले अकल्याण करणारांवर ही क्रोध न करितां त्यांचे हित करितात तेच विद्वान् होत, इतर नव्हे —

**अपकारिणि ये कोपं न कुर्वन्ति महाधियः।**
**उपकारञ्च कुर्वन्ति विद्वांसस्ते न चेतरे ॥**

आत्म० पु० अ० ४ श्लो० ७२

अत: जर आपण सांगितल्या प्रमाणें मला राग आल्या विना आपले काम होणार नसेल तर मी आता राग आणतो, असे म्हणून जवळच पडलेली काठीं हातांत घेऊन श्रीएकनाथ महाराज त्या ब्राम्हणास मारण्याकरिता सज्ज झाले. त्यांस तसे करित आहे असे पहाताच-आता एकनाथ महाराज आपणास निश्चितच मारतील असे समजून तो ब्राह्मण आपले सामान घेऊन पळून जावूं लागला. तेव्हां तो पळत आहे असे पाहून श्रीएकनाथ महाराजांनी हातांत घेतलेली काठी घेऊन

त्याचे पाठी मागे धावूं लागले. असे हे कधी ही न दिसणारे दृश्य पाहून ते कुटिल लोक हसूं लागले नि प्रसन्न झाले.

जगातील असा व्यवहार पाहूनच म्हटले आहे की—विचित्र आहे हे जग व त्यातील लोकांचे व्यवहार ! खरोखर ! अतिशय दुःखाची गोष्ट आहे की—सज्जन लोक ज्या कार्यांनें लज्जित होतात, मूर्ख लोक त्याच कार्यांनें प्रसन्न होतात—

**अहो बत महत्कष्टं विपरीतमिदं जगत् ।**
**येनापत्रपते साधुरसाधुस्तेन तुष्यति ॥**

महा० भा० वन० प० २।६४

या सदुक्तिनुसार त्या कुटिलांनींही श्रीएकनाथ महाराजांना क्रोधित झाल्याचे पाहून ठरलेल्या अटी प्रमाणें त्या ब्राह्मणास पैसे देऊन त्यास स्वस्थानीं रवाना केले, नंतर श्रीएकनाथ महाराजही प्रसन्न मनानें आपल्या घरीं आलें. म्हटले ही आहे की— जो कोणत्या ही कारणानें वा निमित्तानें क्रोधित होतो, तो तें कारण वा निमित्त नाहीसे झाल्यावर प्रसन्नही होतो—

**निमित्तमुद्दिश्य हि यः प्रकुप्यति ।**
**ध्रुवं स तस्यापगमे प्रसीदति ॥** "पंचतन्त्र"

वरील घटनां द्वारा समाजास शिकवण मिळते की —सज्जन लोकांचा स्वभाव सूपा सारखा असतो-जसे सूप असार भागाचा त्याग करून सार भाग जवळ घेते, तसे सज्जन लोक दोषांचा त्याग करून केवळ सद्गुण ग्रहण करितात.

श्रीएकनाथ महाराजांनीं ब्राह्मणाचे व्यवहारानें क्रोध उत्पन्न होण्याची वेळ आली असताही क्रोध उत्पन्न होवूं न देता मनांवर, इन्द्रियांवर व विकारांवर विजय मिळविण्याचा प्रयत्न केला नि त्यांत ते सफल ही झाले.

ह्याचे उलट दुर्जन लोक चाळणीच्या स्वभावाचे असतात. जशी चाळणी सार भाग गाळून टाकते नि असार भाग जवळ घेते तसे दुर्जन लोक सद्गुणांचा त्याग करून केवळ दोषच ग्रहण करितात. पहाना ! त्या कुटिलांनीं श्रीएकनाथ महाराजांच्या क्षमा, परोपकार, सहनशीलता आदि गुणांद्वारा धडा न घेता त्या ब्राह्मणानें त्यांना क्रोध आणविला म्हणून ते प्रसन्न झाले. म्हटले ही आहे की—

**सन्त्यज्य शूर्पवद्दोषान् गुणान् गृह्णाति सज्जनः ।**
**दोषग्राही गुणत्यागी पल्लोलीव हि दुर्जनः ॥**

सुभा० र० पृ० ५६।३८

म्हणून माणसांनीं सदा सद्गुणग्राही व्हावे.

या शिवाय आपल्या पितरांचे श्राद्धानिमित्त तयार केलेले पदार्थ भूकेनें व्याकूळ झालेल्या अन्त्यजादिकांना खाऊं घालणे. हरिभक्तांची, भगवंताचीं व साधु-सन्तांची अनन्य भावानें सेवा करणाऱ्या अन्त्यजादिकांची भक्ति-प्रेम व श्रद्धा पाहून त्यांचे आग्रहाचे आमन्त्रण स्वीकारून त्यांचे घरीं यथारुचि प्रसाद ग्रहण करून त्यांना संतोषविणे. इत्यादि अनेक घटनां द्वारा श्रीएकनाथ महाराजांच्या परोपकार, समता, भक्ति-भाव आदि सद्‌गुणांचे दर्शन होते.

श्रीएकनाथ महाराजांच्या जीवनांत घडलेल्या अशा अनेक प्रसंगाना यदा कदा अनेकांना तोंड द्यावे लागते. अशा वेळीं सामान्य लोकांस काय करावे नि काय करूं नये ? कसे करावे ? असा पेंच पडतो; म्हणून सर्वसामान्य जीवांना योग्य मार्ग-दर्शन करणे हेच ज्यांचे ध्येय आहे असे साधु-सन्त आपल्या आचरणानें समाजास सत् शास्त्राची व सद्‌विचारांची शिकवण देतात. या दृष्टिने श्रीएकनाथ महाराजांचे जीवन चरित्र सर्वांना मार्गदर्शन करणारे आहे.

वर वर्णन केलेल्या व्यावहारिक घटनां शिवाय काहीं अलौकिक घटना ( चमत्कार ) ही संतांच्या जीवनांत घडतात. श्रीएकनाथ महाराजांच्या जीवनांत ही काहीं अलौकिक घटना घडल्या आहेत. ज्या एकनाथांच्या भक्तिप्रभावाची साक्ष देतात नि प्राण्यांमध्यें उच्च व सुदृढ भक्तिभाव व अटल भगवद् विश्वास जागृत करितात. त्यातील एक-दोन सुप्रसिद्ध घटना संक्षेपतः येथे देण्यात येत आहेत.

**भक्तीचा प्रभावः—**

त्या काळीं पैठण मध्यें "श्रीपाद" नांवाचे स्वामी रहात होते. 'हरिरेव जगज्जगदेव हरिः' 'जनीं वनीं अवघा देव' अशी त्यांची दृढ धारणा व भावना होती, म्हणून ते प्रातःकाळीं दृष्टिसमोर येणाऱ्या निखिल प्राणीमात्रांस भगवद्रूप मानून दण्डवत् नमस्कार करित असत. त्यामुळें लोक त्यांस 'दण्डवत् स्वामी" म्हणूं लागले.

एकें दिवशीं प्रातः काळीं एक मृतगाढव त्या स्वामींच्या दृष्टिस पडले. त्यांनीं त्याला ही दण्डवत् नमस्कार केला. स्वामींचे ते कृत्य पाहून काहीं लोक त्यांना वेडा समजूं लागले. पण थोड्याच वेळानें त्यांनीं पाहिले की - ते मृतगाढव जिवंत झाले. असा हा अद्‌भूत प्रकार पाहून सर्वलोकआश्चर्य चकित झाले. नि स्वामींच्या दण्डवत् नमस्काराचा, त्यांच्या समदृष्टीचा अथवा प्राप्तसिद्धीचा वा भक्तीचा हा प्रभाव असावा असे समजून त्यांची स्तुति करूं लागले. हा ! हा !! म्हणतां ही वार्ता वायुवेगा सारखी सर्वत्र पसरली त्यामुळें कोणी ही मेल्यावर लोक सकाळी त्यास स्वामींच्या मन्दिरा समोर घेऊन येवूं लागले.

'सन्तांचा महिमा संतचि जाणती'' या सन्तोक्तिनुसार श्रीएकनाथ महाराज या स्वामींची योग्यता व अवस्था जाणत होते. एके दिवशी ते त्या स्वामींना भेटले नि म्हणाले की—'आपण नारायण स्वरूप अहात, अतः सर्व सामर्थ्य सम्पन्न ही अहांत यांत संशय नाही. पण अशा प्रकारची सिद्धि पारमार्थिक लाभदृष्टया हानिकारक आहे. अशी प्राचीन ऋषि मुनींची व साधु-सन्तांची शिकवण आहे—

"सिद्धि पावे वाचा । क्षय मागील तपाचा" तु० म०

काहीं दिवसांनीं त्या स्वामींनीं स्वेच्छेनें संजीवनी समाधि घेतली; पण त्यानंतर त्यांच्या अनुयायांनी श्रीएकनाथ महाराजांवर आरोप केला की—'एकनाथांनी च स्वामींकडून समाधि घेवविली.'' जर आमचे हे म्हणणे खरे नसेल तर जसे ३००।३५० वर्षा पूर्वी येथील ब्रह्मवृन्दांची आज्ञा स्वीकारून श्रीसन्त ज्ञानेश्वर महाराजांनीं रेडयाचे मुखातुन वेद वदविले होते, तथा हि—

प्रतिष्ठाने महातीर्थे ब्रह्मवृन्दाभ्यनुज्ञया ।
ऋग्वेदः श्रावितः स्पष्टो महिषस्य मुखादपि ॥
श्री ज्ञाने० स्तोत्र० श्लो० ४.

तदुत्तरवर्ती सन्तांनींही म्हटले आहे की—
'रेडयामुखी वेद बोलविला । गर्व द्विजांचा हारविला । "नाथ"
'पशुमुखी वेदाच्या श्रुति । पढवा कीर्ति तुमची हे "नि०"
'म्हैशीपुत्रामुखे बोलाविणे श्रुति ।...............निळोबाराय

तसे एकनाथांनींही पाषाणाच्या नन्दीश्वराकडून गवत खाववावे. जर पाषाणाच्या नन्दीनें गवत खाल्ले तर एकनाथ निर्दोषी मानले जातील नि जर नन्दीनें गवत न खाल्ले तर सदोषी मानले जातील.

त्यांचे असे भाषण ऐकून श्रीएकनाथ महाराज म्हणाले कीं 'जेणे हे विश्वनिर्मियले' तो ईश्वर सर्वशक्तिमान् आहे. ''वृक्षाचे ही पान हाले ज्याची सत्ता'' अशी त्यांची सत्ता आहे. म्हणून त्याला अशक्य असे काहीच नाही. 'माधवो भक्तवत्सलः; हे त्याचे ब्रीद आहे. म्हणून तोच आपल्या ब्रीदाचे रक्षण करण्या करितां या नन्दीश्वराकडून गवत खाववील. ''असे म्हणून नि भगवंची प्रार्थना करून त्यांनीं गवत पाषाणाचे नन्दीकेश्वरा समोर धरले. तोच त्याने ही सजीव प्राण्यां प्रमाणें सर्वांच्या समक्ष ते खाल्ले. भगवद् भक्तीचा असा अलौकिक प्रभाव पाहून सर्व लोक आश्चर्य चकित झाले नि एकनाथ महाराजांकडे क्षमा मागुं लागले.

अशा प्रकारे प्रपंच व परमार्थ यांचा अपूर्व समन्वय साधित श्रीएकनाथ महाराजांचा जीवनक्रम चालला होता. यथा समयीं त्यांचे आजा-आजी निवर्तले व श्रीगुरु जनार्दन स्वामीही कालान वृद्ध षष्ठीस निजधामाला गेल्याचे त्यांस सम-

जले. "येथे नाहीं उरो आले अवतार। येर ते पामर जीव किती" अशा त्यांचा दृढ बोध होता म्हणून त्यानंतर ही त्यांचा भक्ति प्रवाह अव्याहत, अखण्ड अनवरत चालूं राहिला. पूढें त्यांस श्रीसन्त ज्ञानेश्वर महाराजांचा स्वप्न दृष्टान्त झाला.

**श्रीसन्त ज्ञानेश्वरांचा दृष्टान्तः—**

एकदां श्रीसन्त ज्ञानेश्वर महाराजांनीं श्रीएकनाथ महाराजांच्या स्वप्नांत येवून त्यांस सांगितले की —"माझ्या कंठास येथील अजानवृक्षाची मूळी लागली आहे. आपण येथे ( आळंदीस ) येऊन ती दूर करा." असा स्वप्न दृष्टान्त होताच श्रीएकनाथ महाराज आळंदीस आले. तेथे श्रीसिद्धेश्वरांचे दर्शन करून श्रीज्ञानराज माऊलींच्या समाधीचे द्वार उघडून त्यांच्या समाधिस्थळीं गेले. तेथे पद्मासन घालून बसलेली श्रीज्ञानेश्वर महाराजांची तेजः पून्ज मूर्ति पाहाताच "का तेजचि मूर्त बसले। आसनावरी' असे त्यांन वाटले नि ते त्यांस पाहून गदगदीत झाले. त्यांनीं श्री ज्ञानेशांचे कण्ठास लागलेली अजानवृक्षाची मूळीं दूर केली नि त्यांच्याशीं प्रेमानें बोलले. त्याच वेळीं श्रीज्ञानराज माऊलींनीं आपणाजवळ असलेली श्रीसच्चिदानन्द बाबानीं लिहिलेली "ज्ञानदेवी" ची प्रति त्यांस दाखवून तदनुसार अन्य ज्ञानेश्वरींच्या पाठांचे संशोधन करण्यास त्यांस सांगितले. तेव्हां त्यांची आज्ञा शिरसा वन्द्य मानून श्रीएकनाथ महाराजांनीं "ज्ञानेश्वरी संशोधनाचे कार्यास आरंभ केला. ते कार्य शके १५०६ मध्ये भाद्रपद महिन्यातील कपिला षष्ठीस पूर्ण झाले—

श्रीशके पंचराशे साहोत्तरी। तारण नाम संवत्सरी।
एका जनार्दने अत्यादरी। गीता ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली॥
बहुकाळ पर्वणी गोमटी। भाद्रपदमास कपिला षष्ठी।
प्रतिष्ठानीं गोदातटी। लेखन कामासाठी संपूर्ण जाहली॥

**काशीत नाथांचा गौरव व ग्रन्थरचना—**

काहीं दिवसांनीं श्रीएकनाथ महाराजांनीं प्रतिष्ठानीं ( पैठणमध्यें ) श्रीमद भागवताच्या अकराव्या स्कन्धावर सरळ-सुबोध मराठी टीका लिहिण्यास सुरुवात केली. जेव्हां त्यांचे पांच अध्याय लिहून झाले तेव्हा एका ब्राह्मणानें त्यातील दोन अध्यायांची प्रतिलिपि करून घेतली व ती बरोबर घेऊन तो काशी यात्रेस निघाला. यथासमयीं काशींत आल्यावर मणिकर्णिका घाटावर स्नानादि कर्म आटोपून तो तेथेच भागवतावरील त्या मराठी टीकेचा पाठ करूं लागला.

तेव्हां प्राकृत भाषेंतील वैदिकतत्त्वज्ञानाचा श्रीमद्भागवत ग्रन्थ ऐकून तेथील शास्त्रज्ञांना त्या ब्राह्मणाचा राग आला. त्यांनीं त्याची चौकशी केली नि टिकाक-

त्यांची माहिती विचारून यथासमयीं श्रीएकनाथांस काशीस बोलावून घेतले. श्री-एकनाथ महाराज काशीत आल्यावर ते शास्त्रज्ञ त्यांस म्हणाले की—आपण प्राकृत भाषेंत वैदिक तत्व ज्ञानावर टीकाग्रन्थ लिहिता, हे शास्त्रमर्यादेच्या विरुद्ध आहे,

त्यांचे भाषण ऐकून श्रींएकनाथ महाराजांनीं विनम्रपणानें आपली स्थिति त्यांस निवेदित केली की—"आपल्या सारख्या थोर शास्त्रज्ञांच्या व भगवं-ताच्या कृपेचाच हा प्रसाद आहे. मी केवळ निमित्त मात्र आहे" पण त्यांच्या ह्या बोलण्याचा त्यांच्यावर काहीच परिणाम झाला नाहीं. उलट त्यांनीं एकनाथांची भर्त्सना केली व त्यांच्या समोरच त्यांचा तो टीकाग्रन्थ गंगेंत फेकून दिला.

आपल्या भक्तांचे रक्षण करण्यास भगवन्त सदा ही तत्पर असतात ( मागे पूढे उभा राहे सांभाळित। आलिया आघात निवाराया ) तेव्हां ही असेच झाले. त्या शास्त्रज्ञांनीं फेकलेला तो टीकाग्रन्थ पाण्यांत पडतो न पडतो तोच भगवती भागीरथींनीं आपले रत्नजडित हात वर केले नि तो ग्रन्थ वरत्रेवर आपल्या हातांनी झेलला. व नंतर श्रीएकनाथांना बोलावून त्या सर्वांच्या समक्ष तो ग्रन्थ त्यांच्या हातीं देऊन एकनाथांचा व त्या टीका ग्रन्थाचा गौरव केला. भगवती भागीरथींनीं अशा प्रकारें त्या दोघांचा गौरव केलेला पाहून ते सर्वशास्त्रज्ञ व इतर लोक चकित झाले नि ते सर्व एकनाथ महाराजांना शरण गेले.

नंतर काशीतच काहीं दिवस राहून श्री एकनाथ महाराजांनीं राहिलेल्या २६ अध्यायांवर टीका लिहून तो ग्रन्थ पूर्ण केला. श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्क-न्धाच्या (३१) एकतिसाव्या अध्यायाचे शेवटी ग्रन्थास आरंभ कोठे केला व ग्रन्थ कोठे व कधी पूर्ण झाला, हे लिहितांना ते म्हणतात—

ग्रन्थारम्भ प्रतिष्ठानीं। तेथे पंचाध्यायी संपवूनी।
इतर ग्रन्थाची करणी। आनन्द विस्तारिली॥
…"वाराणसी आनन्दवन। एकाशीचिनांवे जाण।……………

भाग० अ० ११।३१।५२५।२६

वाराणसी मुक्तिक्षेत्री। मणिकर्णिका महातीरी।
पंचमुद्रा पीठा माझारी। एकादशावरी टीका केली॥
वाराणसी महामुक्तिक्षेत्र। विक्रम शक वृष संवत्सर।
शके सोळासे तिसोत्तर। टीका एकाकार जनार्दन कृपा॥
महामङ्गल कार्तिक मासी। शुक्ल पक्ष पूर्णिमेशी।
सोमवार शिवयोगेसी। टीका एकादशी समाप्त केली॥

शालिवाहन शक वैभव । संख्या चौदासे पचाण्णव ।
श्रीमुख संवत्सराचे नांव । टीका अपूर्व ते जाहली ॥
भा० अ० ११।३१।५३३–५१–५२–५४

अशा प्रकारे भागवतावर टीका लिहून झाल्यावर त्यांनीं "श्रीरुक्मिणीस्वयंवर" नांवाचे ललित खण्डकाव्य लिहिले नि नंतर पुनः पैठणला आले. तेथे आल्यावर त्यांनीं यथासमयीं आनन्दलहरी, श्रीहस्तामलक, शुकाष्टक, स्वात्मबोध, हरिपाठ आदि मौलिक व टीका ग्रन्थ, भक्तिज्ञानामृतानें परिपूर्ण स्फुट अभंग, सांस्कृतिक भारुडे व अनेक पदे लिहून "भावार्थ रामायण "नांव चे महाकाव्य लिहिले.

श्री एकनाथ महाराजांची ही विपुल ग्रंथ सम्पदा महाराष्ट्र सारस्वत भाण्डारातील अमूल्य निधि आहे. ज्यांत सदाचार, नीति, व्यवहार, कर्म भक्ति, ध्यान व ज्ञानादिकांचा अपूर्व समन्वय साधला आहे.

**निर्वाण :—**

शके १५२१ मध्यें फाल्गुन वद्य पंचमीस श्री एकनाथ महाराजांनीं हरिमन्दिरांत कीर्तन केले. षष्ठीस स्नान-सध्यावंदन भगवदर्चना आदि करून दिण्डीसोहळयासह ते गोदावरी तटी आले. भगवती गोदावरीस नमस्कार केला व पाण्यांत प्रविष्ट होऊन पद्मासन घालून बसले नि "आता आम्ही जातो कृपा असो द्यावी" असे म्हणून सर्वांचा सस्नेह निरोप घेतला नि हरी नामाच्या गजरांत भगवान् श्रीहरींचें स्मरण करित पार्थिव शरीर पंचमहाभूतांत विलीन करिते झाले; तेव्हां सारी मण्डली दुःखी अन्तः करणानें परतली.

**तिथि व त्यांची वैशिष्ठ्ये—**

प्रतिदिन सूर्योदय व सूर्यास्त होतो. त्यामुळें दिन, पक्ष, मास, संवत्सर व युगांत ही परिवर्तन झालेले दिसून येते. तदनुसार किती तरी युगें, संवत्सरे, महिने, तिथी व दिन व्यतीत झाले, पण त्यातील काहीं युगें, महिने, व तिथि आपल्या उदया बरोबर आपणास अलंकृत करणाऱ्या देवी-देवतांच्या व महापुरुषांच्या चरित्रांचे व कार्यकलापांचे स्मरण अद्यापहीं करवितात नि पूढे ही करवित रहातील.

आपल्याकडे युगावतारी देवांची, महापुरुषांची जयन्ती व साधु-सन्तांची पुण्यतिथि साजरी करण्यांत येते. तदनुसार 'जन्माष्टमी' म्हटल्याबरोबर दक्षिण प्रदेशांत द्वापारयुगीय श्रावण महिन्यातील वद्य अष्टमी, व उत्तर प्रदेशांत भाद्रपद कृष्ण अष्टमी तिथि दृष्टिसमोर येते. 'रामनवमी' हे शब्द उच्चारताच सर्वत्र ( दक्षिणोत्तरप्रदेशांतही) त्रेतायुगीय चैत्रमहिन्यातील शुक्ल (शुद्ध) नवमी तिथीचे स्मरण

होते, कारण या तिथींस क्रमशः लीलावतार भगवान् श्रीकृष्णांनीं व मर्यादा पुरुषोत्तम भगवान् श्रीरामचन्द्रांनीं आविर्भूत होऊन त्यांस अलंकृत करून त्यांचा गौरव वाढविला आहे.

श्रीएकनाथ महाराजांच्या जीवन चरित्रांत फाल्गुन वद्य षष्ठी तिथीसही विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे ते असे—

१ याच तिथीस एकनाथ महाराजांचे श्रीगुरु जनार्दन स्वामीचा जन्म झाला.
२ ,, ,, जनार्दन स्वामींना श्रीदत्तात्रेयांचे दर्शन झाले.
३ ,, ,, श्रीएकनाथ महाराजाना श्रीगुरु जनार्दन स्वामींचे दर्शन व अनुग्रह झाला.
४ ,, ,, जनार्दन स्वामींचे देहावसान झाले.
५ ,, ,, श्रीएकनाथ महाराज पार्थिव शरीर पंच महाभूतात विलीन करिते झाले.

म्हणून फाल्गुन वद्य षष्ठी महाराष्ट्रांत 'नाथषष्ठी" नांवाने प्रसिद्ध झाली आहे.

## समारोप—

जगांत विभिन्न स्वभावाचे व गुणाचे लोक रहातात. त्यांत काहीं बोलण्यामध्यें खूप पटाईत असतात. म्हणून ते एकाक्षणांत चुटकीचा मांडव घालतात नि म्हणतात की—सर्वभूतमात्रांत परमात्मा निवास करित आहे, म्हणून सर्वमानव एकाच ईश्वराचीमूलें आहेत. यास्तव सर्वांशी बन्धुत्वभावानें व्यवहार करावयास हवा आदि. पण जेव्हां प्रत्यक्ष व्यवहार करण्याचा प्रसंग येतो तेव्हां असे बोलणारे लोक नजर चुकवितात. निमित्त काढून पळ काढतात, काहीं लोक आदेशानुसार कार्य करितात. ते ते कार्य करितांना ते योग्य आहे की नाही याचा विचारच करित नाहीत, काहीं बोलतात नि करितात ही पण या दृष्टिनें की—आपणास ५।१० माणसांत उठावे-बसावे लागते. तेव्हां शिष्टाचार म्हणून अथवा मोठ्यांचा सन्मान म्हणून कधी काहीं कार्य करावे लागले तर ते करतात ही, पण मनांत त्या कार्याविषयीं प्रेम नसते. म्हणूनच ते कधी कधी सहजच म्हणून जातात की—काय करावे? कधी कधी जाति करितां माती खावी ही लागते. म्हणून करावे लागते. आदि; काहीं असे असतात की— त्यांच्या मनांत पुष्कळ असते की अमुक करावे, तमुक करावे, जगांत ऊंच-नीच, गरीबश्रीमन्त, मालक-मजूर असा भेद-भाव नसावा. सर्वत्र समतेचे साम्राज्य असावे आदि. पण असे विचार मनांत बाळगणारे तसे करण्यास समर्थ नसतात, काहीं जसे मनांत असते तसेच बोलतात नि बोलण्यानुसार करितात.

वरील विवेचनावरून जगातील लोकांचे खालील प्रमाणें वर्ग पडतील— (१) केवळ बोलणारे (२) केवळ करणारे (३) बोलणारे व करणारे (४) मनांत करण्याची इच्छा बाळगणारे (५) जसे मनांत असते तसेच बोलणारे व करणारे.

वरील प्रकारांपैकीं जे कायेनें वाचेनें व मनानें सर्व कार्यांत सलग्न झालेले असतात, ज्यांच्या कायिक, वाचिक व मानसिक कर्यांत एकरूपता असते, ते साधु-सन्त म्हटले जातात,

यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रिया ।
चित्ते वाचि क्रियायाश्च साधूनामेकरूपता ॥ सु० भा० र.

श्रीएकनाथ महाराज जसे मनांत चिन्तित होते तसे बोलत होते नि बोलण्यानुसार करित ही होते. म्हणून त्यांचे जीवन चरित्र प्रवृत्तिमार्गीय व निवृत्तिमार्गीय ( प्रापंचिक व पारमार्थिक ) जनांकरितां सोज्वळ दर्पण आहे. ज्यांत दोघांचीही प्रतिबिंबे स्पष्ट गोचर होतात. दोघांनाही त्यांच्या जीवनापासून दृढ प्रेरणा व उज्वल शक्ति मिळते. भक्ति व ज्ञान सम्पादन करितां येते, म्हणून नाथांचे जीवन सर्वांना उद्‌बोधनीय व अनुकरणीय झाले आहे.

श्री एकनाथ महाराज निजजीवनाचे व दया क्षमा शान्ति, सहनशीलता, समदर्शिता, परोपकार, सदाचार परायणता, भक्ति, ज्ञान वैराग्यादि गुणांचे अनुसरण करणाऱ्या निखिल जनांस सुख व शान्ति प्रदान करोत अशी प्रार्थना करून ही शब्दभावकुसुमांजली त्यांचे चरणकमली समर्पण करून श्रीसन्त तुकोबारायांच्या अमृतवाणी द्वारा त्यांची करुणा भाकितो—

शरण शरण एकनाथा । पायीं माथा ठेविला ॥
नका पाहूं गुण दोष । झालो दास पायांचा ॥
उपेक्षिता मज । तरी हे लाज कवणासी ? ॥
तुका म्हणे भागवत । केले श्रुत सकळा ॥

हरि ॐ तत्सत्



खण्ड २रा

"श्रीरुक्मिणीपाण्डुरङ्गाभ्यां नमः"

# श्री एकनाथ संस्तुतिः

( मराठी "इन्दु" व्याख्या व "अलका" टीके सहित )





रचयिता—

श्री आत्मारामशास्त्री बोरकर

साहित्य सुधाकर, सा० दर्शनाचार्य

( काशी )

हरि ॐ

# श्री एकनाथ संस्तुतिः

स्थान परिचयः—

कदाचिद् ब्रह्मदेवेन श्रीकृष्णदर्शनेच्छया।
गोदातटे प्रतिष्ठाने ह्याचरितं महत्तपः॥ १॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—कदेति = कदाचित् = केव्हां तरी, ब्रह्मदेवेन = ब्रह्मदेवानें, गोदातटे = गोदावरीच्या तटावर ( विराजमान असलेल्या ) प्रतिष्ठाने = प्रतिष्ठानमध्यें ( पैठणमध्यें ) श्रीकृष्णदर्शनेच्छया = ( श्रीकृष्णस्य दर्शनं श्रीकृष्णदर्शनं' श्रीकृष्णदर्शनस्य इच्छा, श्रीकृष्णदर्शनेच्छा तया ) श्रीकृष्णस्य = भगवान् श्रीकृष्णांच्या, दर्शनस्य = दर्शनाच्या, इच्छया = इच्छेनें, महत्तपः = महान् तप, हि, आचरितं = केले॥ १॥

"अलका" टीका—केव्हां तरी ब्रह्मदेवानें गोदावरीच्या तटावर विराजमान असलेल्या श्रीक्षेत्र प्रतिष्ठान ( पैठण ) मध्यें भगवान् श्रीकृष्णांच्या दर्शनाकरितां महान् तप केले॥ १॥

तपसा तेन सन्तुष्य हरिणा स सनाथितः।
तदा संस्थापिते तेन यत्र कृष्णस्य पादुके॥ २॥

सान्वय "इन्दु" व्याख्याः—तप इति, हरिणा = श्रीकृष्णांनीं तेन = त्या, तपसा = तपानें, सन्तुष्य = सन्तुष्ट होऊन, सः = ब्रम्हदेव, सनाथितः = सनाथ केला. ( अर्थात् चतुर्भूजरूपानें त्यास दर्शन देऊन कृतार्थ केले ) तदा = तेव्हां, ( भगवंतांनीं दर्शन दिल्यावर त्यांच्या त्या रूपाचे नित्य दर्शन वा स्मरण व्हावे या इच्छेनें ) तेन = ब्रम्हदेवानें, यत्र = जेथें ( ज्या प्रतिष्ठानांत, पैठणांत ) कृष्णस्य = श्रीकृष्णांच्या, पादुके' = पादुका, संस्थापिते = (त्यांच्याच हातांनीं) स्थापित केल्या॥ २॥

अलका—श्रीकृष्णांनीं त्या तपानें सन्तुष्ट होऊन व त्यास ( ब्रह्मदेवास ) दर्शन देऊन जेव्हां कृतार्थ केले तेव्हां भगवंताच्या त्या

(१) आख्यायिका—"पैठण पहा."

रूपाचे नित्य दर्शन वा स्मरण व्हावे, या इच्छेने ब्रम्हदेवानें ज्या श्रीक्षेत्र पैठणांत भगवान् श्रीकृष्णांच्या काष्ठ पादुका त्यांच्या हातांनीं स्थापित केल्या. ॥ २ ॥

श्री एकनाथांच्या अवताराचे प्रयोजन—

समन्वयाय ज्ञानस्य भक्तेर्ध्यानस्य कर्मणः ।
परस्परेषु भूतानां मित्रतावर्धनाय च ।
दीनानां दुःखतप्तानां कल्याणाय सदा भुवि ।
सत्कुले जन्म जग्राह तत्र नाथः शिरोमणिः ॥ ३–४ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्याः—सम इति—भुवि = पृथ्वीतलावर, तत्र = त्या, श्रीक्षेत्र प्रतिष्ठानांत ( पैठणांत ), कर्मणः = कर्माचा, ध्यानस्य = ध्यानाचा, भक्तेः = भक्तीचा, च = आणि, ज्ञानस्य = ज्ञानाचा, समन्वयाय = समन्वयकरण्या करितां, भूतानां = मानवांची व जीवजन्तूंची, परस्परेषु = परस्परांत, मित्रतावर्धनाय = ( मित्रतायाः वर्धनं मित्रतावर्धनं तस्मै मित्रतावर्धनाय ) मित्रतायाः—मित्रतेच्या, वर्धनाय = वाढीकरितां, दीनानां = इन्द्रियांचे अधीन झालेल्यांच्या, । ( इद्रियांची दीने । .......तु. म. ) दुःखतप्तानां = दुःखैः तप्ताः, दुखतप्ताः तेषाम् ) दुःखैः = आध्यात्मिक, आधिभौतिक, व आधिदैविक दुःखांनी ( आध्यात्मिक = शारीरिक व्याधिपासून व कामक्रोधादि विकारांपासून होणारे दुःख; आधिभौतिक = व्याघ्रादि प्राण्यांपासून होणारे दुःख, अधिदैविक = देवी—देवताग्रहादिकां पासून होणारे दुःख ) या त्रिविध दुःखांनीं,

अथवा दुःखैः = परिणाम-ताप-संस्कारांनीं अर्थात्, परिणाम दुःख, तापदुःख संस्कार दुःख यांनीं; ( परिणामदुःख = उपभोग्य वस्तूच्या उपभोगानें वाढलेली च्छा पूर्ण न झाल्यानें उपभोग्य वस्तु परिणामी दुःखरूप वाटतात, हे परिणाम दुःख होय; तापदुःख = सुखकारक पदार्थांचा उपभोग घेत असतां ही त्या पदार्थांच्या विरुद्ध पदार्थीं विषयीं मनांत द्वेष असल्यानें त्या सुखकारकपदार्थांचा उपभोग घेत असतानांही जे दुःख होते, ते तापदुःख होय, संस्कार दुखः = चित्तात प्रिय अथवा अप्रिय वस्तूंचे जे अनेक संस्कार असतांत, त्या अनेक संस्कारांपासून होणारे दुःख संस्कार दुःख होय ) या त्रिविध दुःखानीं; तप्तानां = तापलेल्यांचे ( तापत्रये तापली......ज्ञा० म० ) सदा = सदा; कल्याणाय = कल्याणकरण्या करितां; शिरोमणिः नाथः = सन्त शिरोमणि श्री एकनाथ महाराज,

सत्कुले =( सतां कुलं सत्कुलं तस्मिन् सत्कुले ) सतां = सज्जनांच्या ( सन्त भानुदासांच्या ) कुले = कुळांत, जन्म = जन्म, जग्राह = घेते झाले. ॥ ३—४॥

अलका—पृथ्वीतलावर त्या श्रीक्षेत्र प्रतिष्ठान ( पैठण ) मध्यें कर्म, ध्यान, भक्ति व ज्ञान यांचा समन्वय करण्याकरितां मानवांची व जीव-जन्तूंची परस्परांत मित्रता वाढविण्याकरितां, इन्द्रियांच्या अधीन झालेल्यांच्या व आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक या अथवा परिणाम, ताप व संस्कार या त्रिविध दुःखांनीं तापलेल्यांचे सदा कल्याण करण्याकरितां सन्त शिरोमणि श्रीएकनाथ महाराज श्रीसन्त भानुदासांच्या वंशांत जन्म घेते झाले. ॥ ३—४ ॥

श्रीएकनाथांचे माता-पिता:—

माता श्रीरुक्मिणी यस्य पतिसेवापरायणा ।
सूर्यनारायणस्तातः सेवमानो दिवाकरम् ॥ ५ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—मातेति—पतिसेवापरायणा =( पत्युः सेवा पतिसेवा, पतिसेवायां परायणा पतिसेवापरायणा ) पत्युः = पतीची, सेवायां = सेवेंत, परायणा = पारंगत असलेली, श्रीरुक्मिणी = श्रीरुक्मिणीबाई, यस्य = ज्यांची, माता = आई, व दिवाकरं = सूर्याची, सेवमानः = सेवा-करणारे, सूर्यनारायणः = श्रीसूर्यनारायण, यस्य = ज्यांचे, तातः = पिता होते ॥ ५ ॥

अलका—पतीची सेवा करण्यांत परायण असलेली श्री रुक्मिणीबाई ज्यांची आई व भगवान् सूर्याची उपासना करणारे श्रीसूर्यनारायण ज्यांचे पिता होते ॥ ५ ॥

लालन—पालन—

नक्षत्रस्य प्रभावेन पितरौ तौ दिवं गतौ ।
पितामहेन भक्तेन पालितश्चक्रपाणिना ॥ ६ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—नक्षेति—नक्षत्रस्य = मूलनक्षत्राच्या, प्रभावेन = प्रभावानें, तौ = ते दोघे, पितरौ =(माता च पिता च माता पितरौ) माता व पिता, दिवं = निजधामाला, गतौ = गेल्यावर, भक्तेन = भगवंताची उपासना करणाऱ्या पितामहेन = आजोबांनी, चक्रपाणिना = श्रीचक्रपाणींनीं (यः) पालितः = ज्यांचे पालन—पोषण केले ॥६ ॥

अलका—मूळनक्षत्राच्या प्रभावानें माता व पिता निजधामाला गेल्यावर ( निवर्तल्यावर ) भगवंताची भक्ति करणाऱ्या आजोबांनी श्रीचक्रपाणींनीं ज्यांचे पालन-पोषण केले ॥ ६ ॥

श्रीगुरुदर्शन—

फाल्गुने कृष्णपक्षस्य षष्ठयां वै मङ्गले दिने ।
श्रीगुरोर्दर्शनं लेभे पुण्ये "देवगिरौ" व्रती ॥ ७ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—फाल्गुनेति—फाल्गुने=फाल्गुन महिन्यातील, कृष्णपक्षस्य=वद्यपक्षाच्या, षष्ठ्यां=षष्ठीस, मंगलेदिने=पवित्र दिनीं, पुण्ये=पूनीत, देवगिरौ="देवगिरि" नांवाच्या पर्वतावर, व्रती=श्रीगुरुदर्शना करितां व्रत करणारे श्रीसन्त एकनाथ महाराज, श्रीगुरोः=श्रीगुरुजनार्दन स्वामींचे, दर्शनं=दर्शन, लेभे=करिते झाले. ॥ ७ ॥

अलका—श्रीगुरुंच्या दर्शनासाठी तळमळणारे श्रीएकनाथ महाराज फाल्गुन महिन्याच्या वद्यपक्षातील षष्ठीस मंगल दिनीं पवित्र "देवगिरि" नांवाच्या पर्वतावर श्रीगुरुजनार्दन स्वामींचे दर्शन करिते झाले. ॥ ७ ॥

श्रीगुरुंचा अनुग्रहः.—

एकाग्रतां भक्तिभावं विज्ञाय स्वामिनिष्ठतां ।
जनार्दनेन गुरुणा तिथौ षष्ठ्यां सनाथितः ॥ ८ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—एकेति—( ज्यांची ) एकाग्रतां=एकाग्रता ( जमाखर्चाचा ताळमेळ घालण्यास दिला असता त्यांत आढळलेली एक पै ची चूक सांपडविण्या करितां एकाग्रतेनें रात्री जागरण करून ती चूक सांपडविल्या नंतर टाळी वाजवून दाखविलेली एकाग्रता ) स्वामिनिष्ठतां=स्वामिनिष्ठता, (जनार्दन स्वामी नित्याच्या ध्यानांत निमग्न झाले असतां अकस्मात् परचक्र आल्यामुळें युद्धास जाण्याचा त्यांना राजाचा आदेश झाल्यावर श्रीगुरुंचा दरबारी वेष घालून, घोड्यावर बसून, सैन्याचे नेतृत्व करून, शत्रूंना पराजित करून येऊन दाखविलेली स्वामीभक्ति ) व भक्तिभावं=भगवंताच्या ठिकाणीं असलेली श्रद्धा, प्रेम व भक्ति विज्ञाय=जाणून, गुरुणा जनार्दनेन=श्रीगुरुजनार्दन स्वामींनीं, षष्ठ्यां तिथौ=फाल्गुन वद्य षष्ठी तिथीस ( ज्यांस ) सनाथितः=सनाथ केले. (अनुग्रह देऊन कृतार्थ केले).

अलका—जमाखर्चाचा ताळमेळ घालण्यास दिला असतां त्या-

तील चूक सांपडवून व्यक्त केलेली ज्यांची एकाग्रता, परचक्र परत लावून दाखविलेली स्वामीनिष्ठता, भगवद् भक्ति आदि जाणून श्रीगुरु जनार्दन स्वामींनीं फाल्गुन वद्य षष्ठीस ज्यांस अनुग्रह देऊन कृतार्थ केले ॥ ८ ॥

भगवान् श्री दत्तात्रेयांचे दर्शन —

दत्तात्रेयं मुनिं शान्तं ब्रह्मतत्त्वनिदर्शिनम् ।
गिरौ श्रीगुरुणा साकं साक्षात्कृत्वा ऽतिनन्दितः ॥ ९ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या-दत्तेति—( श्रीगुरु जनार्दन स्वामींच्या कृपाप्रसादानें ) जे गिरौ="देवगिरि" नांवाच्या पर्वतावर, श्रीगुरुणा साकं=श्रीगुरु जनार्दन स्वामींच्या सह, ब्रह्मतत्वनिदर्शिनं=ब्रह्मतत्वाचे निदर्शन करविणाऱ्या, शान्तं=शान्त, मुनिं=मुनि, दत्तात्रेयं=भगवान् श्रीदत्तात्रेयांचा साक्षात् कृत्वा=साक्षात्कार करून, अतिनन्दितः=अति आनन्दित झाले ॥ ९ ॥

अलका—जे श्रीगुरु जनार्दन स्वामींच्या कृपाप्रसादानें देवगिरीवर श्रीगुरुंच्या बरोबर ब्रह्मतत्वाचे निदर्शन करणाऱ्या शान्त मुनिश्रीदत्तात्रेयांचा साक्षात्कार करून अति आनन्दित झाले. ( अर्थात् श्रीगुरुजनार्दन स्वामींनीं दत्तात्रेयांचा साक्षात्कार करविल्यावर त्यांच्या दर्शनानें जे अति प्रसन्न झाले ) ॥ ९ ॥

ध्यानमग्नदशेंत नागाद्वारा रक्षण —

ध्यानमग्नदशायां तु लीनो यः परमात्मनि ।
फणेन फणिना तापाच्चण्डरश्मेः सुरक्षितः ॥ १० ॥

सान्वय 'इन्दु' व्याख्या-ध्यानेति—यः=जे, ध्यानमग्नदशायां ( ध्याने मग्नः, ध्यानमग्ना, ध्यानमग्ना या दशा, ध्यानमग्नदशा तस्यां ध्यानमग्न दशायाम् ) ध्यानमग्नदशेंत. परमात्मनि=परमात्मस्वरूपांत लीनः=लीन ( निमग्न ) झाले, तेव्हां फणिना=नागानें फणेन=फणीनें, चण्डरश्मेः=( चण्डस्य रश्मिः चण्डरश्मिः तस्य चण्डरश्मेः ) चण्डस्य=सूर्याच्यां, रश्मेः=किरणाच्या, तापात्=तापापासून (यः=जे ) सुरक्षितः=रक्षिले ( अर्थात् ज्यांचे रक्षण केले ) ॥ १० ॥

अलका—जे ध्यानमग्नदशेंत परमात्मस्वरूपांत लीन झाले अस-

ता नागानें येऊन आपल्या फणीनें ( ज्यांच्यावर छाया करून ) सूर्याच्या तापापासून ज्यांचे रक्षण केले ।। १० ।।

तीर्थयात्रा व गृहस्थाश्रमप्रवेशः—

श्रीगुरूणां निदेशेन तीर्थेषु यः परिभ्रमन् ।
विभिन्नां संस्कृतिं ज्ञात्वा द्वितीयाश्रममाश्रयत् ।। ११ ।।

सान्वय "इन्दु" व्याख्या—श्रीगुरु इति—यः—जे, श्रीगुरुणां=श्रीगुरु जनार्दन स्वामींच्या, निदेशेन =आज्ञेनें, तीर्थेषु=विभिन्न तीर्थ-क्षेत्रांत. परिभ्रमन्=परिभ्रमण करित ( त्या त्या तीर्थांची यात्रा करित ) विभिन्नां-संस्कृतिं=नाना प्रकारचे आचार-विचार, ज्ञात्वा=जाणून ( घेऊन परत आल्यावर ) श्रीगुरुणां=श्रीगुरु जनार्दन स्वामींच्या निदेशेन=आज्ञेनें यः–जे, द्वितीयाश्रमं=गृहस्थाश्रम, आश्रयत्=स्वीकार करिते झाले. ।। ११ ।।

अलका—जे श्रीगुरु जनार्दन स्वामींच्या आज्ञेनें दक्षिणोत्तर भारतातील नाना तीर्थ-क्षेत्रांची यात्रा करित. त्या त्या प्रदेशांतील आचार विचार जाणून घेऊन परत आल्यावर श्रीगुरुंच्याच आज्ञेनें गृहस्थाश्रम स्वीकार करिते झाले. ।। ११ ।।

भार्या हि गिरिजादेवी यस्यासीद् धर्मचारिणी ।
गंगा गोदा च कन्ये द्वे पुत्रश्च पण्डितो हरिः ।। १२ ।।

सान्वय "इन्दु" व्याख्या—भार्येति—यस्य=ज्यांची धर्मचारिणी भार्या=सहधर्मचारिणी पत्नी गिरिजादेवी=गिरिजाबाई, आसीत्,=होती, ( ज्यांस ) गङ्गा च गोदा=गङ्गा व गोदावरी, नांवाच्या, द्वे=दोन कन्ये=कन्या, च=आणि हरिः पण्डितः=हरि पण्डित नावाचा, पुत्रः=मुलगा, आसीत्=होता. ।। १२ ।।

अलका—ज्यांची सहधर्मचारिणी पत्नी गिरिजाबाई होती, ज्यांस गङ्गा व गोदावरी नावांच्या दोन कन्या व हरिपण्डित नांवाचा मुलगा होता. ।। १२ ।।

स्वधर्मपालन व भगवदर्चना—

श्रौतं स्मार्तं निजं धर्मं विधिना परिपालयन् ।
कायेन मनसा वाचा भगवन्तं समार्चयत् ।। १३ ।।

सान्वय "इन्दु" व्याख्या—श्रौतेति—( जे ) निजं=आपले, श्रौतं=( श्रुतौ विहितं ) वेदविहित ( 'श्रुतिस्तु वेदो विज्ञेयः' मनुः ) स्मार्तं=(स्मृतौ

प्रतिपादितम् ) स्मृतिप्रतिपादित, धर्मं = आश्रमधर्मं, विधिना = विधीनें परिपालयन् = परिपालन करित, कायेन = शरीरानें, मनसा = मनानें, वाचा = वाणीनें, भगवन्तं = भगवान् श्रीहरींचे प्रतिरूप भगवान् पांडुरंगाची, समार्चयत् = उपासना करिते झाले ॥ १३ ॥

अलका—जे आपल्या वेदविहित व स्मृतिप्रतिपादित गृहस्थाश्रमधर्मांचे विधिपूर्वक परिपालन करित काया, वाचा मनानें भगवान् श्रीपांडुरंगाची उपासना करिते झाले. ॥१३॥

भगवान् श्रीहरिद्वारा सेवाकार्य—

इत्थमर्चनया तस्य प्रसन्नो भूतभावनः ।
यावत् षट्त्रिंशद्वर्षाणि छन्नः कैङ्कर्यमाचरत् ॥१४॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—इत्थमिति—तस्य = त्यांच्या ( श्रीएकनाथमहाराजांच्या ) इत्थं = अशा प्रकारच्या, अर्चनया = अनन्य उपासनेनें, ( सः—ते ) विश्वभावनः = भगवान् श्रीहरि, प्रसन्न = प्रसन्न होत्साते छन्नः = छद्मरूपानें षट्त्रिंशद्वर्षाणि यावत् = छत्तीसवर्षे पर्यन्त ( श्रीखण्डया, केशव व उद्धव रुपानें प्रत्येकीं १२ + १२ + १२ = ३६ वर्षे पर्यन्त ) ज्यांचे कैंकर्य = ( किंकरस्य कार्यं ) सेवक कार्य, आचरत् = करिते झाले. ॥१४॥

अलका—त्यांच्या अशा प्रकारच्या अनन्य उपासनेनें विश्वभावन भगवान् श्रीहरि प्रसन्न होत्साते ३६ वर्षे पर्यन्त ज्यांचे घरीं छद्मरूपानें सेवाकार्य ( चाकरी ) करिते झाले ॥१४॥

कावडीनामभिःपात्रै र्भवने जलमर्पयन् ।
चन्दनं घर्षयित्वा च नित्यं मोदमवाप सः ॥१५॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—कावडीति—( भगवान् श्रीहरि ) कावडीनामभिः पात्रैः = कावडी नांवाच्या पात्रांनीं, ज्यांचे भवने = घरीं, जलं = पाणी, अर्पयन् = भरित, च = आणि, देवपूजेकरितां चन्दनं = चन्दन, घर्षयित्वा = घासून देऊन नित्यं = नित्य, मोदं = आनन्द, अवाप = प्राप्त करिते झाले. ) ॥१५॥

अलका—( भगवान् श्री हरि ) ज्यांच्या घरीं कावडींनीं पाणी भरून व देवपूजेकरितां चन्दन घासून देऊन नित्यं आनन्दाचा

अनुभव करिते झाले ( अर्थात् श्रीहरि आनंदानें—प्रेमानें ज्यांच्या घरी वरील कामें करिते झाले. ) ॥१५॥

श्री एकनाथांची भूतदया—

रामेश्वराभिषेकार्थं नयन् श्रीजाह्नवीपयः ।
मार्गे सम्पाययामास मरणासन्नरासभम् ॥१६॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—रामेति—(जे) रामेश्वराभिषेकार्थं = ( रामेश्वरस्य अभिषेक: रामेश्वराभिषेक:, स एव अर्थ: प्रयोजनं यस्य स रामेश्वराभिषेकार्थ: तम् ) रामेश्वरस्य = भगवान् श्रीरामेश्वरांचा, अभिषेकार्थं = अभिषेककरण्या करितां, ( काशीहून आणलेले ) श्री जाह्नवीपय: = भगवती गंगामाईचे पाणी, नयन् = नेत असतां मार्गे = वाटेवर, मरणासन्नं = ( आसन्नं मरणं यस्य तम् ) मरण जवळ आलेल्या ( तहानेमुळें मृत्यु मुखांत जाणाऱ्या ) रासभं = गाढवास, ( ते पाणी ) सम्पाययामास = पाजिते झाले. ॥१६॥

अलका—जे भगवान् श्रीरामेश्वरांच्या अभिषेकाकरितां श्रीक्षेत्र काशीहून आणलेले गंगाजल श्रीक्षेत्र रामेश्वरास नेत असतां वाटेवर तहानेनें व्याकूळ होऊन मरणासन्न झालेल्या गाढवास ( दयेनें ) पाजिते झाले ॥१६॥

सहृदयता—

मार्तण्डतापसन्तप्तमन्त्यजस्याऽपि बालकम् ।
प्रीत्या स्वस्कन्धमारोप्य तद्गृहं नीतवान् सुखम् ॥१७॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—मार्तण्डेति—जे मार्तण्डतापसन्तप्तं = ( मार्तण्डस्य ताप: मार्तण्डताप:, मार्तण्डतापेन सन्तप्त: मार्तण्डतापसन्तप्त: य: तम् ) मार्तण्डस्य = सूर्याच्या, तापेन = तापानें, सन्तप्तं = तापलेल्या, अन्त्यजस्य = अन्त्यजाच्या अपि = ही, बालकं = बालकास, प्रीत्या = प्रेमानें, स्वस्कन्धं = स्वत: चे खान्द्यावर, आरोप्य = घेऊन सुखं = सुखपूर्वक, तद्गृहं = ( तस्य गृहं तद्गृहं ) तस्य = त्याच्या, गृहं = घरीं, नीतवान् = नेते झाले. ॥१७॥

अलका—जे सूर्याच्या तापानें तापलेल्या अन्त्यजाच्या बालकास प्रेमानें आपल्या खांद्यावर घेऊन सुखपूर्वक ( त्यास ) त्याचे घरीं नेते झाले. ॥१७॥

क्षमा ( सहिष्णुता )—

म्लेच्छेन ष्ठीवनेनाऽपि शरीरे मलिनीकृते।
वितन्वन्धन्यवादांश्च प्रसादेन सनाथितः ॥१८॥

सान्वय "इन्दु" व्याख्या = म्लेच्छेति—(गोदावरीत स्नान करून परत घरीं येत असतां ) म्लेच्छेन = यवनानें, ष्ठीवनेन = थूंकीनें, शरीरे मलिनीकृते = ( न मलिनं अमलिनं, अमलिनं मलिनं कृतमिति मलिनीकृतम् तथा सति ) मलिन नसलेले शरीर मलिन (अपवित्र) केल्यावर, अपि = ही, ( ज्यांनीं त्यास ) धन्यवादान् = धन्यवाद, वितन्वन्=देऊन, च = आणि प्रसादेन = कृपाप्रसाद देऊन, सनाथितः = सनाथ केले ( मुक्त केले ) ( "यवन अंगावरी थुंकला । प्रसाद देऊनि मुक्त केला" सन्तवचन )'

अलका—गोदावरींत स्नान करून परत घरीं येत असतां यवनानें थूंकीनें शरीर मलिन केल्यावर ही ज्यांनीं त्या यवनास धन्यवाद व कृपाप्रसाद देऊन सनाथ ( मुक्त ) केले. ॥१९॥

कुटिलांची करामत—

धनार्थी वै प्रतिष्ठाने याचनाय समागतः ।
कुटिलैः प्रेरितः सोऽपि नाथस्य क्रोधदीपने ॥१९॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—धनेति = (जेव्हां मुलाच्या उपनयनाकरितां द्रव्य मिळविण्याचे इच्छेनें आलेला ) धनार्थी = द्रव्याची याचना करणारा ( ब्राम्हण ) प्रतिष्ठाने = पैठणांत, याचनाय = याचना ( प्रार्थना ) करण्याकरितां, समागतः = आला; ( तेव्हां तेथील ) कुटिलैः = कुटिलांनीं, सः = तो ब्राह्मण, अपि = ही, नाथस्य = श्रीएकनाथांचा, क्रोधदीपने = क्रोध उद्दीप्तकरण्याकरितां, प्रेरितः = प्रेरित केला ( प्रेरणा देऊन पाठविला ) ॥१९॥

अलका—जेव्हां धनार्थी ब्राह्मण द्रव्यमागण्या करितां पैठणमध्यें आला, तेव्हां तेथील कुचर ओटयावरील कुटिलांनीं त्यास श्रीएकनाथांना क्रोधित करण्याकरितां प्रेरित केले ( पाठविले ) ॥१९॥

ब्राह्मणाचा देवघरांत प्रवेश—

त्वरया गृहमासाद्य सोपानत्कः स ब्राह्मणः ।
सहसा चैकनाथस्य प्राविशद् देवमन्दिरम् ॥२०॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—त्वरेति—(तेव्हा) स = तो, = ब्राह्मणः =

ब्राह्मण, त्वरया = त्वरेनें, ( नाथांच्या ) गृहं = घरीं, आसाद्य = जाऊन, ( नाथ देवाची पूजाकरित आहेत तेव्हां ही वेळ त्यांस क्रोध आणविण्यास चांगली आहे असे समजून ) सहसा = अकस्मात् एकनाथस्य = श्रीएकनाथांच्या, देवमन्दिरं = देवांच्या मन्दिरांत ( देवघरांत ) सोपानत्कः = पायांतील जोड्यांसह, प्राविशत् = प्रविष्ट झाला. ॥२०॥

अलका—तेव्हां तो ब्राह्मण त्वरेनें नाथांच्या घरीं जाऊन त्यांना क्रोधित करण्यास अकस्मात् त्यांच्या देवघरांत पायांतील जोड्यांसह प्रविष्ट झाला. ॥२०॥

याचक गिरिजाबाईंच्या पाठीवर—

एतेनाऽपि न संक्रुद्धं नाथं ज्ञात्वा स याचकः ।
भुञ्जानः सह नाथेन गिरिजां विगतकल्मषाम् ॥
अर्पयन्तीश्च भोज्यान्नं तस्य भार्यां समारूहत् ।
मनागपि न तेनाऽपि क्रोधस्तत्रैव लक्षितः ॥२१।२२॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—एतेनेति—( पण ) एतेन = त्याच्या या कृत्यानें, अपि = ही, नाथं = श्रीएकनाथांस, संक्रुद्धं = क्रोधित, न = न ( झालेले ) ज्ञात्वा = जाणून, सः = तो, याचकः = याचक ब्राह्मण, (नाथांच्या आग्रहानें) नाथेन = श्रीएकनाथ महाराजांच्या, सह = बरोबर, भुञ्जानः = जेवणारा ( ब्राह्मण ) भोज्यान्नं = भोजनाचे पदार्थ, अपर्यन्तीं = वाढणाऱ्या, तस्य = एकनाथांच्या, विगतकल्मषां = पाप वासनारहित, भार्यां गिरिजां = पत्नी गिरिजाबाईंच्या ( पाठीवर ) समारूहत् = उडीमारून बसला. ( पण असे केल्यावर ) तेन = त्यानें, तत्राऽपि = तेंथें ही ( गिरिजाबाई व नाथांच्या ठिकाणीं ही) मनागपि = थोडा ही क्रोधः = कोप ( राग ) न = नाही, लक्षितः = पाहिला. ( अर्थात् नाथांना वा गिरिजाबाईंना त्याचा थोडाही राग आला नाही ) ॥२१।२२॥

अलका—पण त्याच्या या कृत्यानें ही श्रीएकनाथ महाराज क्रोधित झाले नाहीत, असे पाहून त्यांस पुनः राग आणविण्याकरितां तेथें थांबून, नाथांच्या आग्रहानें त्यांच्या बरोबर जेवणास बसलेला तो ब्राह्मण जेवणाचे पदार्थ वाढणाऱ्या, एकनाथ महाराजांच्या विकार रहित असलेल्या पत्नी गिरजाबाईंच्या पाठीवर ( त्या वाढण्या करितां ओणव्या झाल्या तेव्हां ) उडीमारून बसला, पण असे

करून ही त्यानें त्या दोघांच्या ठिकाणीं थोडा ही क्रोध (राग) पाहिला नाही. ॥२१।२२॥

ब्राह्मणाद्वारा स्ववृत्तान्तकथन—

ततः स्पष्टं स्ववृत्तान्तं ब्राह्मणः प्रत्यपादयत् ।
कुटिलैर्वञ्चितो नूनं महत्पापं समाचरम् ॥ २३ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—तत इति—ततः=त्यानंतर; ब्राह्मणः = तो ब्राह्मण, स्ववृत्तान्तं=स्वतःचा वृत्तान्त, स्पष्टं=मोकळ्या मनानें, प्रत्यपादयत्=त्यांस सांगता झाला, की, नूनं=निश्चयही, कुटिलैः=कुटिलां कडून (मी) वंचितः=वंचित झालो, नूनं=निश्चयही (मी द्रव्याच्या अभिलाषेनें) महत्पापं=मोठे पाप, समाचरम्=केले. (अर्थात् आपणास राग आणण्या करितां मी केलेले आचरण निश्चितही मोठे पाप झाले आहे) ॥ २३ ॥

अलका—त्यानंतर तो ब्राह्मण स्वतः चा वृत्तान्त स्पष्ट-(मोकळया मनानें) नाथांस सांगता झाला की—आता मी निश्चित ही कुटिलां कडून वंचित झालो (अर्थात् आपणास राग न आल्यानें आता मला त्यांजकडून द्रव्य मिळणार नाही. खरोखर ! मी द्रव्याच्या अभिलाषेनें मोठेच दुष्कृत्य केले.) ॥ २३ ॥

क्षमा, उसना राग व द्रव्यदान—

अतः क्षमां विधेहि त्वं यास्यामि निजमन्दिरम् ।
मनोभावं तु विप्रस्य ज्ञात्वा यः करुणालयः ॥
सहसा दण्डमुद्यम्य धावन्तमन्वधावत ।
दृष्ट्वैवं कुटिलाः सर्वे विप्राय प्राददुर्धनम् ॥ २४।२५ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—अत इति—अतः—म्हणून, त्वं=(हे नाथ !) तुम्ही, (मला) क्षमां=क्षमा, विधेहि=करा, (माझे काम होत नाही, असे पाहून, आतां मी) निजमन्दिरं=माझ्या घरीं यास्यामि= परत जाईन. (तेव्हा) विप्रस्य=ब्राह्मणाचा, मनोभावं=मनातील अभिलाषा, ज्ञात्वा=जाणून, करुणालयः=करुणेची साक्षात् मूर्ति, यः=जे, एकनाथ महाराज, (ब्राह्मणाचा हेतु पूर्णकरण्याकरितां व स्वतः स उसना राग आणण्याकरितां) सहसा=अकस्मात् दण्डं=दण्ड, उद्यम्य=(हातांत) घेऊन, धावन्तं=(माराच्या भयानें) पळून जाऊं पहाणाऱ्या, (त्या ब्राह्मणाचे) अन्वधावत=मागे मागे धावूं लागले, तेव्हा एवं=अशा प्रकारच्या (ब्राह्म-

णाचे मागे काठीं घेऊन धावणाऱ्या ) नाथांना, दृष्ट्वा=पाहून, सर्वे कुटिलाः= सर्व कुटिल लोक, ( दिलेल्या आश्वासनानुसार ) विप्राय=त्या ब्राह्मणास, धनं=द्रव्य, प्राददुः=देते झाले. ॥ २४-२५ ॥

अलका—म्हणून हे नाथ ! तुम्ही आतां मला क्षमा करा; आतां मी खाली हातांनीं माझ्या घरी जाईन. त्याचे ते निराशेचे उद्गार ऐकून करुणेची साक्षात् मूर्ति असलेले श्री एकनाथ महाराज त्या ब्राह्मणाचा मनोभाव ओळखून आपणास खरोखर राग आला आहे असे भासविण्याकरितां हातांत काठी घेऊन मारण्याचे भयानें पळून जाऊं पहाणाऱ्या त्या ब्राह्मणाचे पाठीमागें धावूं लागले. तेव्हां ( अशा प्रकारे नाथांना ब्राह्मणाचे मागे रागानें धावत असल्याचे पाहून ) ते कुटिल लोक त्या ब्राह्मणास दिलेल्या आश्वासनानुसार द्रव्य देते झाले. ॥ २४-२५ ॥

भूकेनें पीडलेल्यांना जेववून पितरांस संतोषविणे—

श्राद्धार्थं निर्मितं भोज्यं बुभुक्षितांश्च मानवान् ।
दयया खादयित्वा यः पितृंश्च समतोषयत् ॥ २६ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—श्राद्धेति—यः— जे, श्राद्धार्थं = श्राद्धाकरितां, निर्मितं=तयार केलेले, भोज्यं = भोज्यपदार्थ, दयया =दयेनें, बुभुक्षितान् मानवान्=भूकेनें पीडलेल्या मानवांस, खादयित्वा = खाववून, पितृन्=स्वर्गीय पितरांस, च=आणि, समतोषयत् = संतोषित करिते झाले, ( तृप्त करिते झाले ) ॥ २६ ॥

अलका—जे श्राद्धानिमित्त तयार केलेले मिष्टान्न दयेनें भूकेनें पीडित झालेल्या मानवांना खाऊ घालून ( आपल्या ) स्वर्गीय पितरांस सन्तोषविते झाले ॥ २६ ॥

भूती भगवद् भाव—

यदाहूतो महाभागो योऽन्त्यजैर्हरिसेवकैः ।
भक्त्या च श्रद्धया प्रीत्या भोक्तुं वै निजमन्दिरे ॥ २७ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—यदेति—यदा=जेव्हां, ( पैठण मधील ) हरिसेवकैः=हरिभक्तांनीं, अन्त्यजैः=अंत्यजांनीं, श्रद्धया=श्रद्धेनें, प्रीत्या= प्रेमानें, भक्त्या =भक्तिनें, यः महाभागः=ज्या महापुरुषांस, निजमन्दिरे= आपल्या घरीं, भोक्तुं=जेवण्याकरितां, आहूतः=बोलाविले. ॥ २७ ॥

अलका—जेव्हां पैठणमधील नित्य भागवत श्रवण करण्यास येणाऱ्या हरिभक्तांनीं व अन्त्यजांनीं श्रद्धेनें, भक्तिनें व प्रेमानें ज्या महाभागांस आपल्या घरीं जेवण्यास बोलाविले ॥ २७॥

हरिरेव जगत्सर्वमिति ज्ञात्वा कृपानिधिः ।
तांश्च सन्तोषयामास समदर्शी महामनाः ॥ २८ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—हरिरिति—( तेव्हां ) सर्वं=सर्व, जगत्=जग, हरिः=हरी, एव=च, ( होण्यास्तव ) इति=असे, ज्ञात्वा= जाणून, यः=जे, कृपानिधिः=कृपेचे सागर,' समदर्शी=समदर्शी, महामनाः=महान् आत्मा असलेले ( श्रीएकनाथ महाराज ) त्यांचे घरीं यथारुचि प्रसाद ग्रहण करून) तान्=त्यांना सन्तोषयामास=सन्तुष्ट करिते झाले. ॥२८॥

अलका—तेव्हां सर्व जगत् हरिरूप असल्यामुळें सर्वभूतांत हरीच नटला आहे, असे जाणून ज्या कृपानिधि समदर्शी. महान् आत्म्यानें त्यांचे घरीं यथारुचि प्रसाद ग्रहण करून त्यांस संतोषविले. ॥ २८ ॥

दण्डवत् स्वामींस तात्त्विक उपदेश—

सजीवो विहितो येन प्रणम्य मृतरासभम् ।
आदिष्टो दण्डवत्स्वामी तात्त्विकैर्वचनामृतैः ॥ २९ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—सजीवइति— येन=ज्या महापुरुषानें, मृतं=मेलेल्या, रासभं=गाढवास, प्रणम्य=नमस्कार करून, ( सिद्धि बलानें त्यास पुनः ) सजीवः=सजीव, विहितः=केले, ( ते ) दण्डवत्स्वामी= दण्डवत् स्वामी नांवानें प्रसिद्ध असलेले, येन=ज्यांनीं, तात्त्विकैःवचनामृतैः= तात्त्विक वचनामृतांनीं, आदिष्टः=उपदेशिले ॥ २९ ॥

अलका—ज्यांनीं मेलेल्या गाढवास नमस्कार करून सिद्धि बलानें पुनः त्यास सजीव केले त्या निखिल प्राण्यांना दण्डवत् नमस्कार करणाऱ्या दण्डवत् स्वामींना ज्यांनीं तात्विक उपदेश केला. ॥ २९ ॥

भक्तीचा अद्भूत प्रभाव—

आज्ञापितो यदा लोकैः स्वामिपादानुरागिभिः ।
नन्दीश्वरेण शैलेनाऽखादयद् यस्तृणं तदा ॥ ३४ ॥

सान्वय "इदु" व्याख्या-आज्ञेति—( तो उपदेश ऐकून काहीं दिवसांनीं त्या स्वामींनीं संजीवनी समाधि घेतल्यावर त्यांतीच स्वामींकडून समाधि घेवविली

असा स्वामींच्या अनुयायांनीं आरोप घेतला असता तन्निराकरणार्थ) स्वामिपादानुरागिभिः लोकैः=दण्डवत् स्वामींच्या अनुयायांनीं, यः=जे (ज्यांस) आज्ञापितः=आज्ञा केली. तदा=तेव्हा, (त्यांच्या आज्ञेनुसार गाढेश्वरमन्दिराच्या समोरील) शिलेन नन्दीश्वरेण=पाषाणाच्या नन्दीकेश्वराकडून, यः=जे, तृणं=गवत, अखादयत्=खावविते झाले. ॥ ३० ॥

अलका—दण्डवत् स्वामींनीं स्वतः समाधि घेतल्यावर स्वामींच्या अनुयायांनीं घेतलेला आरोप दूर करण्याकरितां त्यांच्या आज्ञेनुसार ज्यांनीं पाषाणाच्या नन्दीकेश्वराकडून गवत खावविले. ॥३०॥

श्री ज्ञानेश्वरमहाराजांचा स्वप्नांत आदेश—

ज्ञानेशस्य निदेशेन गत्वा ऽलकावतीं पुरीम् ।
दूरीकृत्य तरोर्मूलं ज्ञानदेवी विशोधिता ॥ ३१ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—ज्ञानेशेति—(ज्यांनीं) ज्ञानेशस्य=श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या, निदेशेन=आज्ञेनें (आदेशानें) अलकावतीं पुरीं=अलकावती नगरीस (आळंदीस) गत्वा=जाऊन, तरोः=अजानवृक्षाची मूलं=मूळी (ज्ञानेश्वर महाराजांच्या कण्ठास लागलेली) दूरीकृत्य=दूर करून, (ज्यांनी) ज्ञानेशस्य=ज्ञानेश्वरांच्या, निदेशेन=आज्ञेनें, ज्ञानदेवी=ज्ञानेश्वरी विशोधिता=संशोधित केली. (शुद्ध केली) ॥ ३१ ॥

अलका—ज्यांनीं श्रीसन्त ज्ञानेश्वर महाराजांच्या आदेशानें आळंदीस जाऊन त्यांच्या कण्ठास लागलेली अजानवृक्षाची मूळी दूर करून त्यांच्याच आज्ञेनें ज्ञानेश्वरीचे संशोधन केले. ॥ ३१ ॥

श्रीक्षेत्र काशींत भागवतावर टीका—

काश्यां भागीरथी तीरे विश्वनाथानुकम्पया ।
पञ्चगंगाभिधे घट्टे स्थापिते कृष्णमन्दिरे ॥
एकादशस्य स्कन्धस्य श्रीमद्भागवतस्य च ।
विहिता देशभाषायां टीका तत्त्वप्रकाशिनी ॥ ३२-३३ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—काश्यामिति—(ज्यांनीं संस्कृत विद्येच्या माहेरघरीं) काश्यां=श्रीक्षेत्र काशींत, (त्रैलोक्यपावनी भगवती) भागीरथीतीरे=भागीरथीच्या प्रशान्त तटीं, पञ्चगंगाभिधे घट्टे='पञ्चगङ्गा" नांवाचे घाटावर, विश्वनाथानुकम्पया=(विश्वनाथस्य अनुकम्पा विश्वनाथनुकम्पा, तया) विश्वनाथस्य=भगवान् विश्वनाथांच्या, अनुकम्पया=अनु-

कृपेनें, स्थापिते कृष्णमन्दिरे=स्थापन केलेल्या श्रीकृष्णमन्दिरांत, विश्वनाथानुकम्पया=श्री विश्वनाथांच्या कृपाप्रसादानें, (ज्यांनीं) श्रीमद्भागवतस्य एकादशस्य स्कन्धस्य=श्रीमद् भागवताच्या अकराव्या स्कन्धावर, देशभाषायां=मराठी भाषेमध्यें, तत्त्वप्रकाशिनी=परमार्थ तत्त्वांचे प्रकाशन करणारी सरळ व सुबोध टीका=टीका, विहिता=केली, ॥३२-३३॥

अलका—ज्यांनीं विद्येच्या माहेरघरीं श्री क्षेत्र काशींत भगवती भागीरथीच्या तटीं "पञ्चगंगा" नांवानें प्रसिद्ध असलेल्या घाटावर भगवान् विश्वनाथांच्या कृपेनें स्थापन केलेल्या श्रीकृष्णमन्दिरांत भगवान् विश्वनाथांच्या कृपाप्रसादानें श्रीमद् भागवताच्या अकराव्या स्कन्धावर मराठी भाषेंत परमार्थतत्त्वाचे प्रकाशन करणारी सरळ व सुबोध टीका लिहिली. ॥३२-३३॥

भागीरथीद्वारा ग्रन्थाचे रक्षण

टीकां तां सुलभां श्रुत्वा रुष्टविज्ञैस्तिरस्कृता ।
निक्षिप्ता जाह्नवीनीरे तत्र देव्या सुरक्षिता ॥
स्वकराभ्यां समुत्थाय नाथहस्ते समर्पिता ।
इत्थं तद्गौरवं दृष्ट्वा चकितास्तद्विरोधिनः ॥३४।३५॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—टीकेति—(ज्यांच्या) तां=त्या, सुलभां =सुलभ, टीकां=मराठी टीकेस, (वाचणारा कडून) श्रुत्वा=ऐकून, रुष्टविज्ञैः=काशीतील रुष्ट झालेल्या विद्वांनांनीं, ती तिरस्कृता=तिरस्कृत केली, (व क्रोधाच्या आवेशानें त्यांनीं ती) जाह्नवीनीरे=भागीरथीच्या पवित्र जलांत, निक्षिप्ता=फेकली, तेव्हां, तत्र=पाण्यांत, देव्या=भगवती भागीरथीनें, सा=ती, सुरक्षिता=सांभाळिली व रत्नजडित स्वकराभ्यां=स्वतःच्या हातांनीं, समुत्थाय=उचलून घेऊन, ती टीका नाथहस्ते=श्रीएकनाथांच्या हातांत पुनः समर्पिता=समर्पित केली (तेव्हां) इत्थं=अशा प्रकारे, भगवती भागीरथीनें केलेला तद्गौरवं=(तस्य तस्या वा गौरवः तद्गौरवः तम्) तस्य=एकनाथांचा वा तस्याः=टीकेचा, गौरवं=गौरव, दृष्ट्वा=पाहून, तद्विरोधिनः=(तस्य तस्या वा विरोधिनः) तस्य=श्रीएकनाथमहाराजांचे, वा तस्या=टीकेचे; विरोधिनः=विरोधीलोक, चकिताः=चकित झाले. ॥ ३४-३५ ॥

अलका—ज्यांच्या त्या सुलभ मराठी टीकेस ऐकून (वैदिक

तत्त्वज्ञान प्राकृत भाषेंत केलेले पाहून ) रुष्ट झालेल्या विद्वानांनीं ती टीका तिरस्कृत केली, व क्रोधाच्या आवेशानें त्यांनीं ती ( टीका ) भागीरथीच्या पवित्र जलांत फेकली; तेव्हां भगवती भागीरथीनें ती सांभाळिली व स्वतःच्या रत्नजडित हातांनीं उचलून घेऊन ती टीका पुनः श्रीएकनाथमहाराजांच्या हातांत समर्पित केली; अशा प्रकारे भगवती भागीरथीनें त्या टीकेचा (व एकनाथमहाराजांचा ) गौरव केलेला पाहून त्यांचे विरोधी लोक आश्चर्यचकित झाले. ॥३४।३५॥

अन्य ग्रंथरचना—

ततश्च ललितं काव्यं श्रीरुक्मिणीस्वयंवरम् ।
रामायणं महाकाव्यं भावार्थाख्यं च निर्मितम् ॥
आनन्दलहरीञ्चैव श्रीहस्तामलकादिकम् ।
अभङ्गान् रचयामास भक्तिज्ञानसमन्वितान् ॥ ३६–३७ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—तत इति—ततः = त्यानंतर, च ललितं = ललित, काव्यं = खण्डकाव्य, श्रीरुक्मिणीस्वयंवरं = श्रीरुक्मिणीस्वयंवर च = आणि, भावार्थाख्यं रामायणं = भावार्थरामायण नांवाचे, महाकाव्यं = महाकाव्य, निर्मितं = रचिले; ततः = नंतर, (जे) आनन्दलहरीं = आनंद-लहरी, श्रीहस्तामलकादिकं = श्रीहस्तामलक, चिरंजीवपद, स्वात्मसुख, शुकाष्टक हरिपाठादि लघुग्रंथ व भक्तिज्ञानसमन्वितान् = ( भक्त्या ज्ञानेन च समन्विता, भक्तिज्ञानसमन्विताः तान् ) भक्त्या = भक्तिनें, ज्ञानेन = ज्ञानानें, समन्विताः=समन्वित, अभङ्गान्=अभंग, रचयामास=रचिते झाले ॥३६।३७॥

अलका—ज्यांनी नन्तर काशींतच श्रीरुक्मिणी स्वयंवर नांवाचे ललित खण्डकाव्य व नंतर पैठणमध्यें भावार्थरामायण नांवाचे महाकाव्य, आनन्दलहरी, हस्तामलक, चिरंजीवपद, स्वात्मसुख, शुकाष्टक हरिपाठादि लघु मौलिक व टीका ग्रंथ नि भक्तिज्ञानानें समन्वित स्फुट अभंगांची रचना केली ॥ ३६।३७ ॥

उच्च आदर्श—

विवेकः सह सम्बुद्ध्या विनयो विद्यया सह ।
लक्ष्मीयुतञ्च स्वामित्वं यस्यासीद् वै निरंतरम् ॥३८॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—विवेक इति—यस्य = ज्यांचे (ठिकाणीं निरन्तरं = सदा, सम्बुद्ध्या = सद्बुद्धि, सह = सह, विवेकः = विवेक,

विद्यया = विद्ये, सह = सह, विनयः = नम्रता, च = आणि, निरन्तरं = सदा, लक्ष्मीयुतम् = लक्ष्मीसह, सामर्थ्यं = वैभव, आसीत् = वसत होते ॥ ३८ ॥

अलका—ज्यांच्या ठिकाणीं सदा सद्बुद्धि सह विवेक, सद्विद्ये सह विनय व लक्ष्मीसह सामर्थ्य-वैभव निरन्तर वसत होते. ॥३८॥

प्रपञ्चं परमार्थञ्च संसाध्य येन यत्नतः ।
आदर्शः स्थापितो लोके सर्वेषां हितकारकः ॥ ३९ ॥

सान्वय "इन्दु" व्याख्या प्रपञ्चेति—येन = ज्यांनीं, यत्नतः = प्रयत्नानें, प्रपचं = सफल प्रपंच, च = आणि. परमार्थं = उत्तम परमार्थ, संसाध्य= सम्पादन करून, लोके = इहलोकीं, सर्वेषां = निखिल प्राण्यांचे. हितकारकः = कल्याणकरणारा. आदर्शः = उच्च आदर्श, स्थापितः=स्थापित केला. ॥ ३९ ॥

अलका—ज्यानीं प्रयत्नबलानें सफल प्रपंच व उत्तम परमार्थ संपादन करून इहलोकीं प्राणीमात्रांचे कल्याण करणारा उच्च आदर्श स्थापित केला. ॥ ३९ ॥

निर्वाण—

फाल्गुने कृष्णपक्षस्य षष्ठ्यां पुण्यतमे दिने ।
हरिं स्मरन् शरीरं यो गोदावर्यां समार्पयत् ॥४०॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—फाल्गुन इति—( अशाप्रकारे प्रपंच व परमार्थ सम्पादून ) यः = जे, फाल्गुने = फाल्गुन महिन्यांत, कृष्णपक्षस्य = कृष्णपक्षाच्या, षष्ठ्यां = षष्ठी तिथीस, पुण्यतमे दिने = पुण्यतमदिनीं, हरिं = भक्तवत्सल श्रीहरीचे, स्मरन् = स्मरणकरित, गोदावर्यां = परमपावनी गोदावरींत, शरीरं = पार्थिवशरीर, समार्पयत् = विसर्जित करते झाले ॥ ४० ॥

अलका—अशा प्रकारे सफल प्रपंच व उत्तम परमार्थ करून जे फाल्गुन महिन्याच्या कृष्ण ( वद्य ) पक्षातील षष्ठीस पुण्यतम दिनीं भक्तवत्सल श्रीहरीचे स्मरण करित आपले पार्थिव शरीर परमपावनी गोदावरीत विसर्जित करिते झाले. ॥ ४० ॥

तमहं श्रद्धया प्रीत्या सर्वभूतहिते रतम् ।
उदारचेतसं धीरं सदाचारपरायणम् ॥

विमलज्ञानदातारं त्रिविधातपहारकम् ।
एकनाथं महाराजं स्तौमि प्रणतिपूर्वकम् ॥४१–४२॥

सान्वय "इन्दु" व्याख्या—तमिति—तं = त्या, सर्वभूतहिते = ( सर्वेषां भूतानां हितं, सर्वभूतहितं, तस्मिन् सर्वभूतहिते ) सर्वप्राणीमात्रांच्या हितांत, रतं = रत झालेल्या, उदारचेतसं = ( उदारं चेतो यस्य तम् ) उदार चित्त असलेल्या, धीरं = विकार उत्पन्न होण्याचे वेळीही ते उत्पन्न होवूं न देणाऱ्या, विमलज्ञानदातारं = निर्मल आत्मज्ञान देणाऱ्या, त्रिविधातपहारकं=अध्यात्मिकादि त्रिविध तापांचे निवारण करणाऱ्या, सदाचारपरायणं= सदाचाराचे पालन करणाऱ्या, एकनाथं महाराजं = श्रीसन्त एकनाथमहाराजांची अहं = मी, श्रद्धया = श्रद्धेनें, प्रीत्या = प्रेमानें, प्रणतिपूर्वकं = नमस्कारपूर्वक, स्तौमि = स्तुति करितो. ॥ ४१–४२ ॥

अलका—त्या सर्वभूतमात्रांच्या हितांत रत झालेल्या, उदारचित्त असलेल्या, विमल आत्मज्ञान देणाऱ्या, त्रिविध, तापांचे निवारण व सदाचाराचे पालन करणाऱ्या, विकार उत्पन्न होण्याचे वेळी ही ते उत्पन्न होऊं न देणाऱ्या धीर सत्पुरुषाची श्रीसन्त एकनाथ महाराजांची मी श्रद्धेनें व प्रेमानें नमस्कार पूर्वक स्तुति करितो. ॥४१-४२॥

फलश्रुति—

पठेद्धि श्रद्धया नित्यं य एकनाथसंस्तुतिम् ।
आत्मारामो भवेज्जीवन् यास्यति परमां गतिम् ॥ ४३ ॥

अर्थ—जो मनुष्य श्रद्धेनें व शुद्धान्तः करणानें नित्य "या श्रीएकनाथ संस्तुतीचे पठन-पाठन करिल, तो आत्म्यामध्यें रममाण होत्साता जीव ब्रह्मैक्य ज्ञानद्वारा परमगतिस ( परमपदास ) प्राप्त होइल. ॥ ४३ ॥

हरिः ॐ तत्सत्

श्रीकृष्णार्पणमस्तु

## श्रीएकनाथसंस्तुतिः

कदाचिद् ब्रह्मदेवेन श्रीकृष्णदर्शनेच्छया ।
गोदातटे प्रतिष्ठाने ह्याचरितं महत्तपः ॥ १ ॥
तपसा तेन सन्तुष्य हरिणा स सनाथितः ।
तदा संस्थापिते तेन यत्र कृष्णस्य पादुके ॥ २ ॥
समन्वयाय ज्ञानस्य भक्तेर्ध्यानस्य कर्मणः ।
परस्परेषु भूतानां मित्रतावर्धनाय च ॥ ३ ॥
दीनानां दुःखतप्तानां कल्याणाय सदा भुवि ।
सत्कुले जन्म जग्राह तत्र नाथः शिरोमणिः ॥ ४ ॥
माता श्रीरुक्मिणी यस्य पतिसेवापरायणा ।
सूर्यनारायणस्तातः सेवमानो दिवाकरम् ॥ ५ ॥
नक्षत्रस्य प्रभावेन पितरौ तौ दिवं गतौ ।
पितामहेन भक्तेन पालितश्चक्रपाणिना ॥ ६ ॥
फाल्गुने कृष्णपक्षस्य षष्ठ्यां वै मंगले दिने ।
श्रीगुरोर्दर्शनं लेभे पुण्ये "देवगिरौ" व्रती ॥ ७ ॥
एकाग्रतां भक्तिभावं विज्ञाय स्वामिनिष्ठताम् ।
जनार्दनेन गुरुणा तिथौ षष्ठ्यां सनाथितः ॥ ८ ॥
दत्तात्रेयं मुनिं शान्तं ब्रह्मतत्वनिदर्शिनम् ।
"गिरौ" श्रीगुरुणा साकं साक्षात् कृत्वाऽतिनन्दितः ॥ ९ ॥
ध्यानमग्नदशायां तु लीनो यः परमात्मनि ।
फणेन फणिना तापाच्चण्डरश्मेः सुरक्षितः ॥ १० ॥
श्रीगुरूणां निदेशेन तीर्थेषु च परिभ्रमन् ।
विभिन्नां संस्कृतिं ज्ञात्वा द्वितीयाश्रममाश्रयत् ॥ ११ ॥

भार्या हि गिरिजादेवी यस्यासीद् धर्मचारिणी ।
गंगा गोदा च कन्ये द्वे पुत्रश्च पण्डितोहरि ॥ १२ ॥
श्रौतं स्मार्तं निजं धर्मं विधिना परिपालयन् ।
कायेन मनसा वाचा भगवन्तं समार्चयत् ॥ १३ ॥
इत्थमर्चनया तस्य प्रसन्नो भूतभावनः ।
यावत् षट्त्रिंशद्वर्षाणि छन्नः कैङ्कर्यमाचरत् ॥१४॥
कावडीनामभिःपात्रै भवने जलमर्पयन् ।
चन्दनं घर्षयित्वा च नित्यं मोदमवाप सः ॥१५॥
रामेश्वराभिषेकार्थं नयन् श्रीजाह्नवीपयः ।
मार्गे सम्पाययामास मरणासन्नरासभम् ॥१६॥
मार्तण्डतापसन्तप्तमन्त्यजस्याऽपि बालकम् ।
प्रीत्या स्वस्कन्धमारोप्य तद्गृहं नीतवान् सुखम् ॥१७॥
म्लेच्छेन ष्ठीवनेनाऽपि शरीरे मलिनीकृते ।
वितन्वन्धन्यवादांश्च प्रसादेन सनाथितः ॥१८॥
धनार्थी वै प्रतिष्ठाने याचनाय समागतः ।
कुटिलैः प्रेरितः सोऽपि नाथस्य क्रोधदीपने ॥१९॥
त्वरया गृहमासाद्य सोपानत्कः स ब्राह्मणः ।
सहसा चैकनाथस्य प्राविशद् देवमन्दिरम् ॥२०॥
एतेनाऽपि न संक्रुद्धं नाथं ज्ञात्वा स याचकः ।
भुञ्जानः सह नाथेन गिरिजां विगतकल्मषाम् ॥
अर्पयन्तीश्च भोज्यान्नं तस्य भार्यां समारूहत् ।
मनागपि न तेनाऽपि क्रोधस्तत्रैव लक्षितः ॥२१।२२॥
ततः स्पष्टं स्ववृत्तान्तं ब्राह्मणः प्रत्यपादयत् ।
कुटिलैर्वञ्चितो नूनं महत्पापं समाचरम् ॥ २३ ॥

अतः क्षमां विधेहि त्वं यास्यामि निजमन्दिरम् ।
मनोभावं तु विप्रस्य ज्ञात्वा यः करुणालयः ॥
सहसा दण्डमुद्यम्य धावन्तमन्वधावत ।
दृष्ट्वैवं कुटिलाः सर्वे विप्राय प्राददुर्धनम् ॥ २४।२५ ॥
श्राद्धार्थं निर्मितं भोज्यं बुभुक्षितांश्च मानवान् ।
दयया खादयित्वा यः पितृंश्च समतोषयत् ॥ २६ ॥
यदाहूतो महाभागो योऽन्त्यजैर्हरिसेवकैः ।
भक्त्या च श्रद्धया प्रीत्या भोक्तुं वै निजमन्दिरे ॥ २७ ॥
हरिरेव जगत्सर्वमिति ज्ञात्वा कृपानिधिः ।
तांश्च सन्तोषयामास समदर्शी महामनाः ॥ २८ ॥
सजीवो विहितो येन प्रणम्य मृतरासभम् ।
आदिष्टो दण्डवत्स्वामी तात्त्विकैर्वचनामृतैः ॥ २९ ॥
आज्ञापितो यदा लोकैः स्वामिपादानुरागिभिः ।
नन्दीश्वरेण शैलेनाऽखादयद् यस्तृणं तदा ॥ ३० ॥
ज्ञानेशस्य निदेशेन गत्वा ऽलकावतीं पुरीम् ।
दूरीकृत्य तरोमूलं ज्ञानदेवी विशोधिता ॥ ३१ ॥
काश्यां भागीरथी तीरे विश्वनाथानुकम्पया ।
पञ्चगंगाभिधे घट्टे स्थापिते कृष्णमन्दिरे ॥
एकादशस्य स्कन्धस्य श्रीमद्भागवतस्य च ।
विहिता देशभाषायां टीका तत्त्वप्रकाशिनी ॥ ३२-३३ ॥
टीकां तां सुलभां श्रुत्वा रुष्टविज्ञैस्तिरस्कृता ।
निक्षिप्ता जाह्नवीनीरे तत्र देव्या सुरक्षिता ॥ ३४ ॥
स्वकराभ्यां समुत्थाय नाथहस्ते समर्पिता ।
इत्थं तद्गौरवं दृष्ट्वा चकितास्तद्विरोधिनः ॥ ३५ ॥

ततश्च ललितं काव्यं श्रीरुक्मिणीस्वयंवरम् ।
रामायणं महाकाव्यं भावार्थाख्यं च निर्मितम् ॥ ३६ ॥
आनन्दलहरीञ्चैव श्रीहस्तामलकादिकम् ।
अभङ्गान् रचयामास भक्तिज्ञानसमन्वितान् ॥ ३७ ॥
विवेकः सह सम्बुद्ध्या विनयो विद्यया सह ।
लक्ष्मीयुतश्च स्वामित्वं यस्यासीद्वै निरंतरम् ॥ ३८ ॥
प्रपञ्चं परमार्थञ्च संसाध्य येन यत्नतः ।
आदर्शः स्थापितो लोके सर्वेषां हितकारकः ॥ ३९ ॥
फाल्गुने कृष्णपक्षस्य षष्ठ्यां पुण्यतमे दिने ।
हरिं स्मरन् शरिरं यो गोदावर्यां समर्पयत् ॥ ४० ॥
तमहं श्रद्धया प्रीत्या सर्वभूतहिते रतम् ।
उदारचेतसं धीरं सदाचारपरायणम् ॥ ४१ ॥
विमलज्ञानदातारं त्रिविधातपहारकम् ।
एकनाथं महाराजं स्तौमि प्रणतिपूर्वकम् ॥ ४२ ॥
पठेद्धि श्रद्धया नित्यं य एकनाथसंस्तुतिम् ।
आत्मारामो भवेज्जीवन् यास्यति परमां गतिम् ॥ ४३ ॥



"देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनी"

# प्रसाददानमस्तु[1]

श्रीसन्त ज्ञानेश्वर महाराज

श्रीविश्वात्मक ! हे देव ! मद् वाग्यज्ञेन तुष्यताम् ।
प्रसाददानमेवेदं मह्यं सन्तुष्य दीयताम् ॥ १ ॥

अर्थ—हे ॐ काररूप विश्वात्मक श्री गुरुदेव ! आपण ! माझ्या या वाग्यज्ञानें सन्तुष्ट व्हा नि सन्तुष्ट होऊन संतोष पूर्वक मला हे "प्रसाददान" द्या (अर्थात् मला हा प्रसाद द्या ) ॥ १ ॥

खलानां नश्यताद् दुर्धीः सत्कार्ये वर्धतां रतिः ।
जीवानां मित्रता चैव मिथो भूतेषु युज्यताम् ॥ २ ॥

अर्थ—दुर्जनांची दुर्बुद्धि नष्ट होवो त्यांची व सर्वजनांची सत्कर्मांत प्रीति वाढो ( अर्थात् सर्वलोक सत्कर्म करण्यांत तत्पर होवोत ) मानव-मानवांची व पशु-पक्षी, जीव-जन्तु आदि भूतमात्रांची परस्परांत मित्रता वाढो ॥ २ ॥

दुरितं हि तमोऽपैतु स्वधर्मार्क उदेतु च ।
वाञ्छेद् यत्प्राणिजातं वै तत्तदेवाऽत्र प्राप्नुयात् ॥ ३ ॥

अर्थ—विश्वातील पापरूप ( अज्ञानरूप ) अन्धकाराचा नाश होवो; विश्वांत स्वधर्मरूप सूर्याचा उदय होवो; प्राणिमात्र ( येथे ) जे जे इच्छितील ते ते त्यांस ( येथे ) प्राप्त होवो.

समूह ईशनिष्ठानां मङ्गलानि च वर्षयन् ।
संगच्छतां हि भूतानिं सततं भूमिमण्डले ॥ ४ ॥

अर्थ—ईश्वरावर निष्ठा असलेल्या साधु-सन्तांचा समूह भूतलावर आनंदाची वर्षा करित भूतमात्रांच्या सह सदा विचरण करो ( अर्थात् भूतमात्रांना सदा भेटो )

चलत्कल्पतरूणां स उपवनं च पत्तनम् ।
सच्चिच्चिन्तामणीनाञ्च भवेद् भुवन् सुधार्णवः ॥ ५ ॥

---

१. "ज्ञानेश्वरांतील" पसायदानाचे संस्कृत भाषान्तर,

अर्थ—ईश्वरावर निष्ठा असलेल्या साधु-सन्तांचा हा समूह कल्पतरूंचे चालते, बोलते उद्यान ( बाग ) सद्रूप व चिद्रूप चिन्तामणींचे नगर (शहर) व ज्ञानामृताचा चालता-बोलता समुद्र होवो.

तापहीनो भवेत्सूर्यश्चन्द्रमा गतलाञ्छनः ।
सर्वेषां च भवेदाप्तः सदा सज्जनसंचयः ॥ ६ ॥

अर्थ—हा सज्जनांचासंचय ( समूह ) भूतमात्रांचे कल्याण करणारा ताप-रहित सूर्य कलंक रहित प्रतिचन्द्र, व सदा सर्वांचा आप्तजन होवो.

किं बहुना जनाः सर्वे पूर्णं भूत्वा त्रिमण्डले ।
आदिदेवमुपासध्वमहर्निशमखण्डितम् ॥ ७ ॥

अर्थ—फार काय सांगु ! तिन्ही लोकांतील सर्व प्राणिमात्र सुख-शान्ति पूर्ण होऊन त्यांच्याकडून सतत ( अनवरत प्रवाहित होणाऱ्या जलधारे प्रमाणें ) आदिदेवाची अखंड उपासना होवो.

ग्रन्थ इहोपजीव्योऽयं स्वीकृतो यैर्विशेषतः ।
दृष्टादृष्टजयस्तेषां प्रभो ! भवतु भूतले ॥ ८ ॥

अर्थ—हे प्रभो ! विशेषकरून ज्यांनीं हा ( गीता-ज्ञानेश्वरी ) ग्रन्थ आपल्या जीवनाचा आधार स्वीकार केला त्यांना येथे दृष्ट व अदृष्ट ( इहलीकीचे व पर-लोकीचे ) सुख प्राप्त होवो.

तदोक्तं विश्वदेवेन "प्रसाददानमस्तु" ते ।
वरेणैतेन संजातो ज्ञानदेवः सदा सुखी ॥ ९ ॥

अर्थ—( श्री ज्ञानेश्वर महाराजांची ही प्रार्थना ऐकून ) विश्वदेवस्वरूप श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराज त्यांस म्हणाले की—'तुला हे प्रसाददान प्राप्त होईल' ( जेव्हा श्रीगुरुंचे असे वरदान प्राप्त झाले तेव्हां ) त्यांच्या त्यां वरानें श्रीसन्त ज्ञानेश्वर महाराज सदा सुखी झाले.

भाषान्तर कर्ता—
आत्माराम शास्त्री बोरकर, काशी.